लोकमित्राचें तेराव्या वर्षाचें बक्षीस.

# अनुभव-शतक.

हें

पुस्तक

बापूराव परशुरामजी रत्नपारखी.

मु० वरूड जि० उमरावती.

यांनीं तयार केलें तें

खानापूर येथें

दत्तात्रय गोविंद सडेकर

त्यांनीं आपल्या "धनंजय" छापखान्यांत

छापून प्रसिद्ध केलें.

आवृत्ति १ ली.

शके १८२४ शोभननाम संवत्सरे सन १९०२ ई.

श्री

सकल गुणमंडित परम प्रिय मित्रवर्य.

दत्तात्रय गोविंद मडेकर

लोकमित्रकर्ते

व

धनंजय प्रेसचे

मालक

खानापूर जि: बेळगांव.

यांस

त्यांचा आज्ञांकित मित्र

यानें

हें पुस्तक

मित्र प्रेमभावास्तव आणि त्यांच्या अनेक

गुणांचें द्योतक म्हणून त्यांच्या

परवानगीनें अर्पण केलें असे



बापूराव परशुराम

रत्नपारखी

वैद्य आणि फोटोग्राफर,

वरूड.



# प्रस्तावना.

आमचा वैद्यकीचा धंदा सतत १५ वर्षांपासून चालू आहे. तितक्या अवकाशांत आह्मांस ज्या औषधांपासून कायमचे गुण आले आहेत; अशाच औषधांचा या पुस्तकांत संग्रह केला आहे. ती औषधें **भावप्रकाश, वाग्भट, सुश्रुत, शारंगधर, चक्रदत्त,** इ० प्राचीन व अर्वाचीन लोकमान्य ग्रंथांतूनच घेतलेली आहेत. ज्या औषधापासून जसा गुण आला त्याचें शेकडा प्रमाण ठरवून तें **प्रमाण** औषधांच्या पुढेंच आंकड्यानें दाखविलें आहे

पुष्कळ लोकांनीं वैद्यकीचे ग्रंथ लिहिले पण त्यांनीं कोणत्या औषधींचा गुण किती येतो. हें स्पष्टपणें लोकांस कळविलें नाहीं. जुनाट ग्रंथांत औषधी देऊन त्यांचे मोहगम गुण अतिशयोक्तीनें वर्णन केले आहेत; अशा अतिशयोक्तीनें गुण वर्णन केलेल्या औषधांचा आह्मी अनुभव घेऊन पाहिला पण त्यापासून आह्मास तादृश उपयोग घडून आला नाहीं. ही दिलगिरीची गोष्ट आहे.

आह्मी लिहिलेली सर्व औषधें सर्व प्रकारच्या दोष प्रकृतीस आणि सर्व देशांतील ऋतुमान भेदानें सर्वत्र लागू पडतील अशींच आहेत. त्यापासून अपाय होण्याचा बिलकूल संभव नाहीं. प्रत्येक औषधीप्रयोगांतील जिनसा **प्रसिद्ध असून त्या सर्व ठिकाणीं मिळण्यासारख्या आहेत. आणि यांत न होण्यासारखा एकही प्रयोग आह्मीं लिहिला नाहीं.**

**वर्तमानपत्रांत नशा औषधांच्या भपकेदार जाहिराती**

दिलेल्या असतात आणि औषधांचीं गुणदर्शक नांवें चमचमित करून दिलेली असतात, तसा प्रकार आमचे पुस्तकांत बिलकुल नसून, औषधांस जी परंपरा नांवें चालत आलीं तीच कायम ठेविलीं आहेत. जे लोक जाहिरातीवर भुलून त्यांनीच औषधें घेऊन शेवटीं फसतात व गुण न आल्यामुळें पैसे पाण्यात गेल्याचा पश्चात्ताप करितात; अशा लोकांस आमचें हेंच मागणें आहे कीं, आमच्या या पुस्तकांतून औषधी प्रयोग केल्यास त्यांचीं शरीरें निरोगी राहून त्यांना सदा सौख्य प्राप्त होईल. व विनाकारण पैशाची धुळधाणी होणार नाहीं.

ज्यांना या पुस्तकांतील औषध स्वतः घरीच तयार करणें असल्यास व त्यांना देशपरत्वें औषधांची ओळख नसल्यास त्या सद्गृहस्थांनीं माझ्याकडून प्रयोग समजून घेतल्यास त्यांस मी मोठ्या आस्थेनें प्रयोग समजून देईन. प्रयोगांतील औषधी कोठे ठिकाणी मिळत नसल्यास मोठ्या आनंदानें योग्य किंमतीस औषधी आणून देईन. कदाचित् कोणी गृहस्थ औषधी मजकडून करवून मागतील त्यास योग्य खर्चानें काळजीपूर्वक औषधें करून पाठवीन!

हें पुस्तक प्रत्येक वैद्य धंदा करणारानें जवळ बाळगावें, तसेंच प्रत्येक कुटुंबवत्सलानेंही जवळ बाळगावें म्हणजे वैद्यांची किंवा डाक्टरांची वडावडी तुंबडी भरावी लागणार नाहीं. या पुस्तकापासून किती फायदे आहेत याची प्रचिती अनुभवांतीच येणारी आहे; म्हणून अशा अमोल्य पुस्तकाचा लाभ लहान मोठ्यांनीं दवडूं नये.

या पुस्तकांत काढे, (क्वाथ) चूर्णें, गुटिका, मात्रा, भस्में आणि प्रसिद्ध वनस्पतीचे योग दिले आहेत. ते सर्व

अनुभवजन्य ज्ञानानें पूर्ण प्रतीतीस आलेले आहेत. पुस्तकाचे शेवटीं पुरवणी जोडून त्यांत प्रयोगास लागणारी उपयुक्त माहिती देऊन कठिण शब्दांचा कोश दिलेला आहे.

सारांश, हें पुस्तक संग्रहीं असल्यानें त्याचा प्रत्येक मानवी प्राण्यास किती फायदा होईल याचा अनुभव पाहण्याचें काम वाचकांवरच सोंपवितों.

शेवटीं विद्वज्जनांस हीच प्रार्थना आहे कीं, यांतील दोषांकडे लक्ष न देतां " हंसक्षीर न्यायानें " गुण ग्रहण करून मला उत्तेजन दिल्यास पुढील आवृत्तींत विशेष सुधारणा करण्यास उमेद येईल.

ज्या परमेश्वर आणि जगच्चालक प्रभूच्या कृपेनें हें काम शेवटास गेलें, त्यास अनन्यभावानें शरण होऊन अशीच लोकसेवा मजकडून सदोदित घडावी ह्मणून प्रार्थना करितों.

सर्वांचा नम्र.

मु० वरूड } बापूराव परशुराम रत्नपारखी.
जि० उमरावती } वैद्य आणि फोटोग्राफर.



# अनुक्रमणिका.

| विषय. | | | पृष्ठ. |
|---|---|---|---|

| विषय. | पृष्ठ. |
|---|---|

---

## पूरणिका.



---

## यंत्रें व अग्निपुटें.



---

विषय. पृष्ठ.

## परिभाषा.



---



रत्नशास्त्रीकृत.

# अनुभव-शतक.

## लोलिंबराजचूर्ण.

सुंठ ९ भाग, लेंडी पिंपळी ४ भाग, अजमोदा ६ भाग, खारें मीठ २ भाग, बाळहिरडे १५ भाग यांत बाळहिरडे, लेंडीपिंपळी यांस तुपाचा हात लावून भाजावें व मीठही भाजून घ्यावें. या सर्वांचें सूक्ष्म चूर्ण करून ठेवावें. तें तीन माशांपासून ६ माशांपर्यंत उष्ण पाण्याच्या घोटाशीं घ्यावें. हें पर्वतांचेंही भस्म करील! मग भोजनाची काय कथा? या चूर्णानें अजीर्णाचा तात्काळ नाश होतो, अग्नि प्रदीप्त होतो. शेंकडा १०० स गुण येतो!!!

## २ कांकायनपाक.

•बाळहिरड्यांचें चूर्ण २० तोळे, मिरीं, जिरें, पिंपळी, पिंपळमूळ, चवक व चित्रक हीं प्रत्येकीं ४ तोळे, बिबवे ३२ तोळे, सुरणाचा कंद १४ तोळे व जवखार ८ तोळे या सर्वांच्या दुप्पट गूळ (२०० तोळे) घालून पाक करावा. हा पाक चार माशांपासून सोसेल त्या मानानें १० माशांपर्यंत (अग्निबळ व शक्तिबळ पाहून) सेवन करावा. वर ताकांत सैंधव मिळवून तें ताक प्यावें. या प्रमाणें १४ दिवस करावें. सर्व प्रकारच्या मुळव्याधींचा हटकून नाश होतो. व अग्नि प्रदीप्त उत्तम होतो. शेंकडा ८० गुण!!

## ३ शूल क्षाराम्ल.

आल्याचा रस पावशेर, पिकल्या लिंबाचा रस अर्धा शेर. सुंठ १ तोळा, संचळ १ तोळा, सैंधव १ तोळा, पापडखार १ तोळा, सज्जीखार १ तोळा, बांगडखार १ तोळा, हे सर्व एका बाटलीत ठेवून ती बाटली ७ दिवस तशीच टांगून ठेवावी. नंतर त्यांतील तीन मासे मिश्रण १ तोळा उष्ण पाण्यांत घ्यावें म्हणजे कोणत्याही प्रकारचा शूळ अजीर्ण, व विषूचिका यांचा तात्काळ नाश होतो. याचा गुण शेकडा ९५ स चांगला येतो !!

## ४ अग्निदीपक गुटी.

शुद्ध गंधक ( चोखट तुपांत अग्नीवर पातळ करून तें मिश्रण फडक्यांतून दुधांत ओतावें म्हणजे गंधक दुधांत शुद्ध होतो तो पाण्यांत धुवून सुकवावा. तो उपयोगांत आणावा. ) मिरीं, सैंधव, इंद्रजव आणि वावडिंग, यांचें चूर्ण एकत्र करून लिंबाचे रसांत खलून चण्याप्रमाणें गोळ्या कराव्या. ही उष्ण पाण्याबरोबर गिळावी. अग्नि प्रदीप्त होतो, अजीर्ण व शूळ यांचा नाश होतो. ७ दिवस दोन्ही वेळेस गोळ्या घ्याव्या. पथ्य साधारण करावें. शेकडा ८५ गुण येतो !!

## ५ क्षयहारक गुटिका.

सुंठ, मिरीं, जायफळ, कंकोळ, लवंग, अक्कलकारा, खुरासनी ओवा, रक्तचंदन, खडीसाखर, मनुका, पिंपळी, दालचिनी, खारीक, ह्या जिनसा एक एक तोळा, केशर २ तोळे, आफू १ तोळा, जायफळ ३ तोळे, जायपत्री, नागकेशर १।१ तोळा, व ३ वर्षांचा जुना गूळ सर्व

औषधांबरोबर. ह्या सर्व जिनसा बारीक करून त्यांचा मधांत खल करावा. वाल प्रमाण गोळी करावी. सांज सकाळ एक एक गोळी सेवन करून वर सोसेल इतकें गाईचें दूध प्यावें. वर विडा खावा. याप्रमाणें २१ दिवस करावें. परंतु औषध २० दिवस सेवन्यास उग्रक्षय, धातुक्षय, उरःक्षतक्षय, जीर्णज्वर, ज्वर, वांति, साधारण खोकला इत्यादि विकार जाऊन वीर्यप्राप्ति होते, बल वाढतें, मनुष्य मोठा शक्तिमान होतो. पथ्य— गव्हांची पोळी, साखर, तूप, गाईचें दूध, पांढरा कांदा, पिकलीं केळीं, लोणी, शिंगाडे, उडीद, मांसमृगाचीं पक्वान्नें, ऊन पाण्याचें स्नान व व्यायाम इ० करावीं. बाकी वर्ज्य. गुण शेंकडा ६४ येतो ! !

## ६ अमृतप्रभा गुटी.

मिरीं, पिंपळमूळ, लवंग, हरीतकी, ओंवा, चिंच, डाळिंब, बीडलोण, काचलोण, प्रत्येकीं ४ तोळे, पिंपळी, जवखार, चित्रकमूळ, हिंग, सुंठ, धणे, वेलची, आवळकाठी हीं प्रत्येक आठ तोळे, ह्या सर्वांचें चूर्ण करून त्यास लिंबाच्या रसाच्या तीन भावना द्याव्या. गोळ्या वालप्रमाण करून वाळवून छायेंत सुकवाव्यात. एक गोळी आल्याच्या रसांत मिळवून द्यावी. म्हणजे अजीर्णाचा नाश होऊन अग्नि प्रदीप्त होतो. गळ्यांतील जळजी व आम्लपित्ताचा ७ दिवसांत नाश होतो. याचा गुण शेंकडा ९० प्रमाणानें येतो.

## ७ अतिविषादि काढा.

अतिवीष, नागरमोथा, वाळा, धायटीफूल, कुड्याची.

साल, लोध्र व पाहाडमूळ, यांचा काढा प्याला असतां संग्रहणी, सर्व ज्वर, अरोचक, अग्निमांद्य यांचा नाश होतो. व धातूची वृद्धी होते. याचा गुण संग्रहणीवर शेंकडा ६८ व ज्वरावर शेंकडा ९० आहे.

## ८ अनंतादिचूर्ण.

धमासा, वाळा, नागरमोथा, सुंठ, आणि कुटकी यांचें चूर्ण करून तें सूर्योदयापूर्वी सुखोष्ण पाण्याशीं घेतलें असतां सर्व ज्वरांचा नाश होऊन अग्नी प्रदीप्त होतो. यांत रेचक गुण आहेत. गुण शेंकडा ८९ येतो ! !

## ९ आम्लकोचकई.

आंवळ्यांस किंचित वाफ देऊन त्यांचीं टरफलें बारिक वाटावीं. नंतर त्यांत हिंग, जिरें, मिरें, पिंपळी, सुंठ, धणे, दालचिनी, सैंधव, पादेलोण, हिरडे, मीठ, हीं बारीक करून घालावीं. आणि त्याच्या पैशाएवढ्या वड्या करून वाळवाव्या. ह्या वड्या फार रुचिकारक व पाचक आहेत. याचा शेंकडा १०० स गुण येतो. एक वडी प्रातःकाळीं भक्षण करावी.

## १० वृद्धगंगाधर चूर्ण.

नागरमोथे, टेंटू, सुंठ, धायटीचीं फुलें, लोध्र, वाळा, कोंवळें बेलफळ, मोचरस, पहाडमूळ, इंद्रजव, कुड्याची साल, आंब्याची कोय, अतिविष, लाजेरी, ह्या चौदा औषधांचें चूर्ण प्रत्येक वेळीं तीन किंवा चार मासेप्रमाण तांदुळाचें धुवण व मध यांतून प्यालें असतां प्रवाहिका ( हगवण ) बंद होते. आणि सारे अतिसार आणि संग्-

हणी ही लवकर जातात. या औषधानें नदीच्या वेगा-सारखा अतिसाराचा वेग असला तरी बंद होतो. औषध ७ दिवस द्यावें. यानें शेंकडा ७० गुण अतिसारावर येतो. पण संग्रहणीवर शेंकडा ४९ गुण आल्यास दिसला.

## ११ सुरणपाक.

वाळलेल्या सुरणाचा कंद ३२ भाग, चित्रक १६ भाग, सुंठ ४ भाग, मिरें २ भाग, याप्रमाणें सारीं औषधें घेऊन चूर्ण करून त्या चूर्णाचे दुप्पट गुळाचा पाक करून औषध मिळवून ठेवावें. हा पाक अग्नि, बळ पाहून ४ माशांपासून १० मासेपर्यंत सकाळीं संध्याकाळीं भक्षण करावा. म्हणजे मूळव्याधीचा हटकून नाश होतो. याचा गुण शेंकडा ६८ आहे.

## १२ दशमूळादि काढा.

साल्वण, पिठवण, रिंगणी, डोरली, गोखरू, बेल, ऐरण, टेंटू, शिवण, पाडळ यांच्या दहा मुळांना दशमूळ म्हणतात. यांचा काढा पिंपळीचें चूर्ण घालून द्यावा म्हणजे वात, कफज्वर, सन्निपातज्वर हे हटकून दूर होतात. बाळंत स्त्रियेचा कोणताही विकार व ज्वर असला तरी जातो. आणि शोष, शैत्य, भ्रम, शरीरास येणारा घाम, खोकला, दमा, हृदय ओढल्यासारखें होणें तो विकार, घसा धरणें, बरगड्यांची वेदना, मांपड, मस्तकशूळ, इ० सन्निपातांत होणारे विकार यांचाही नाश होतो. (कडई, पिठवण, रिंगणी, डोरली, गोखरू, बेल, ऐरण, टेंटू, शिवण. मराठी.) या वृक्षमूळांचा कषाय आम्ही देऊन

भाजलेला हिंग, पाहाडमूळ, सज्जीखार, जवखार, दारुहळद, चवक, इंद्रजव, सोंफ, पंचलवण, पिंपळामूळ, बेलकाचरी, अजमोदा हीं सर्व औषधें समभाग घेऊन वस्त्रगाळ चूर्ण करावें. ते उष्ण पाण्याशीं चार मासे प्रमाण भक्षण करावें ह्मणजे त्रिदोषयुक्त असलेला उपदंश, श्वास, शोष, उचकी, खोकला, भगंदर, कुक्षिशूल, वायगोळा, उदररोग, प्रमेह, पांडुरोग, अंत्रवृद्धि, संग्रहणी, विषमज्वर, जीर्णज्वर, उन्माद, इत्यादि रोग याच्या भक्षणानें दूर होतात. हें चूर्ण फारच गुणकारी आहे. याचा अनुभव आह्मांस शेंकडोंवेळां आला आहे.

याचा गुण शेंकडा उपदंशावर ३९; श्वासावर ६८. शोष, उचकी, खोकला यांवर ९९; कुक्षिशूळ, वायगोळा, उदर यांवर ४०. प्रमेह, पांडुरोग, अंत्रवृद्धि यांवर ९८; संग्रहणीवर गुण आला नाहीं. विषमज्वर व जीर्णज्वर ९८; उन्मादावर २७ गुण!!

## १८ चक्रमर्दनतैल.

वावडिंगाच्या मुळ्यांचा अष्टमांश काढा करून त्यांत तितकाच माक्याचा रस मिळवावा. यांच्या समभाग तिळाचें तेल मिळवून हलक्या आंचेनें तेल शेष राहीपर्यंत पक्क करावें. नंतर त्यांत तेलाच्या चौथा भाग शेंदूर मिळवावा. व एक जीव करावें. याच्या लेपानें गंडमाळा असाध्य स्थितींत असल्या तरी नाश पावतात. याचा गुण शेंकडा ९२ आहे.

## १९ कांचन गुगुळ.

कांचनवृक्षाची ( कचनार ) साल ९ भाग, सुंठ १ भाग,

पिंपळी १ भाग, मिरें १ भाग, हिरड्याची साल ५ भाग, बेहड्याची साल ५ भाग, आवळे ५ भाग, वायवर्णाची साल २॥ भाग, दालचिनी १ भाग, पत्री १ भाग, विलायची १ भाग, यांचें वस्त्रगाळ चूर्ण करून याच्या समभाग शोधलेला गुगुळ मिळवावा. त्यांतून ४ मासे प्रमाण प्रातःकाळीं पाण्याबरोबर सेवन करावा. म्हणजे गंडमाळा, गलगंड, अर्बुद, गांठ, वायगोळा, कोड, भगंदर यांचा ४० दिवसांत नाश होतो. याचा गुण शेंकडा गंडमाळेवर ८१; अर्बुद, गांठ व वायगोळा यांवर ७०; भगंदरावर ६५; कुष्टावर ५९; पांढरें कोड दुरुस्त झालें नाहीं व गलगंडावरही गुण आला नाहीं.

## २० पारिभद्र मलम.

कडूनिंबाच्या पानाचा रस एक शेर काढावा, नंतर गाईचें तूप पावशेर कढईत गरम करावें. तूप पातळ झाल्यावर त्यांत राळ २ तोळे मिळवावी. नंतर वरील काढलेला रस त्यांत टाकून अग्निवर थोडा गाढ करावा. त्यांत कात ( पांढरा ) ६ मासे, मोरचूत ६ मासे, मुरदाडसिंग ६ मासे, यांचें बारीक चूर्ण मिळवून एकजीव करावें. त्याची पट्टी ( स्वच्छ कपड्यावर मलम लावून ) व्रणावर लावावी. निश्चयानें असाध्य व्रण दूर होतो. नाडीव्रणावरही फारच चांगला उपयोग होतो. याचा गुण शेंकडा ९० आहे.

## २१ कर्पुरादि गुटी.

भीमसेनी कापूर ५ मासे, कस्तुरी ५ मासे, लवंग ५ मासे, मिरें १० मासे, पिंपळी १० मासे, बेहड्याची साल ( फळावरील ) १० मासे, कोळिंजन १० मासे, आंक्षिय

साल ९ मासे, खैराची साल ९ तोळे ( ६० मासे ) यांचें वस्त्रगाळ चूर्ण करून आल्याच्या रसांत चण्याप्रमाणें गोळ्या कराव्या. एक गोळी खाल्ल्यानें, श्वास, कफ, खोकला, शैत्य यांचा हटकून नाश होतो. याचा गुण शेकडा ९८ येतो.

## २२ लवंगादिवटी.

लवंग १। तोळा, मिरीं १। तोळा, बेहड्याच्या फळां-वरील साल १। तोळा, खैरसाल १। तोळा यांचें बारीक चूर्ण करून बाभळीच्या अंतरसालीच्या काढ्यांत खल करावा. वाल प्रमाण गोळी बांधावी. दररोज तीन गोळ्या ७ दिवस खाल्ल्यानें खोकला दूर होतो. याचा गुण शेकडा ७४ आहे.

## २३ भृगुहरीतकी.

करटोलीचें पंचांग आणून ( १०० तोळे ) त्यांत ४ शेर पाणी घालून काढा चौथाई करावा. त्यांत रंगारी हिरडे १०० शिजवावे. शिजल्यावर हिरड्यांतील बिया काढून टरफलाचें सुकवून चूर्ण करावें. १०० तोळे जुन्या गुळाचा पाक करून त्यांत तें चूर्ण मिळवावें नंतर त्यांत सुंठ ४ मासे, मिरें ४ मासे, पिंपळमूळ ४ मासे, दाल-चिनी ४ मासे, पत्री ४ मासे, नागकेशर ४ मासे, विला-यची ४ मासे, ह्या जिनसांचें चूर्ण मिळवावें आणि ४० तोळे मध त्यांत घालून एकत्र करून ठेवावें. यांतील औषध नित्य ४ किंवा सहा मासे भक्षण केल्यानें सर्व प्रकारचे खोकले हटकून नाश पावतात. याचा गुण शेकडा ८२ आहे.

## २४ उपदंशारीमलम.

मोहलाचें मेण, शेंदूर, व कांगेचा रस हीं तोळा तोळा घेऊन दहा तोळे गाईचे तुपांत कढवून दाट झाल्यावर उतरावें. हें मलम लाविल्यानें गर्मीचे चट्टे, व्रण, नाडीव्रण. हाडांत शिरलेला व्रण व कोणत्याही प्रकारची जखम त्वरित बरी होते. याचा गुण शेंकडा ९० आहे.

## २५ गंगावनयोग.

गंगावन ही वनस्पती पावसाळ्यांत प्रत्येक गांवांत उत्पन्न होते. हिचीं पानें तंबाखूच्या पानासारखीं असून लहान असतात. पानाचा वास फारच उग्र येतो.

या वनस्पतीचा रस १ तोळा व तूप २ तोळा एकत्र मिश्रण करून ७ दिवस प्यावें म्हणजे रक्ताची मूळव्याध हटकून दूर होते. मोडाची मूळव्याध विशेष बरी होत नाहीं. साधारण गुण येतो. याचें प्रमाण शेंकडा ६० आहे.

गंगावनचा रस काढून तो अर्धशिशी असलेल्या भागास चोळावा व उन्हांत बसावें किंवा तो रस उलट बाजूच्या नाकपुडींत ४ किंवा ५ थेंब टाकावा म्हणजे तडाका लागून अर्धशिशी दूर होते. याचा गुण शेंकडा २० आहे.

## २६ कुटजादिकाढा.

कुड्याची साल, आंब्याची साल, जांभळीची साल, अतिविष, बेलफळ, वाळा, नागरमोथे, यांचा अष्टमांश काढा प्रत्येक वेळीं २ तोळे प्रमाणें दिला असतां आम-

शूळ, रक्तातिसार, व फार दिवसांचे दुसरे अतिसार यांचा नाश होतो. रक्तातिसारावर याचा फारच उत्तम गुण आहे. प्रमाण शेकडा ९१ आहे.

## २७ रास्नादिकाढा.

रास्ना, एरंडमूळ, देवदार, वेखंड, सुंठ, धमासा, हरितकी, अतिविष, नागरमोथे, शतावरि, व अडूळसा यांचा काढा मध घालून द्यावा ह्मणजे आमवात, खोकला, कफवात, संधिगतवात, मज्जा, अस्थि व स्नायु यांतील वायु आणि सर्वांग वायु हे निश्चयानें दूर होतात. वायुरोगावर याचा गुण शेकडा ९२ आहे.

## २८ पुनर्नवादि चूर्ण.

पुनर्नवा, देवदार, गुळवेल, सुंठ, गोखरू, पहाडमूळ, हळद, दारुहळद, पिंपळी, चित्रक, अडूळसा, रिंगणी, डोरली या तेरा औषधांचें वस्त्रगाळ चूर्ण करून तें ४ मासे प्रमाण दोन तोळे गोमूत्रांत मिळवून प्यावें. ह्मणजे पुष्कळ दिवसांची सर्व अंगावरील सूज नाश पावते. वरील औषधांचा काढा करून गोमुत्र मिळवून घेतल्यासही गुण येतो. याचें प्रमाण शेकडा ८२ आहे.

## २९ चंद्रप्रभा गुटी.

हळद, निंबाचीं पानें, पिंपळी, मिरें, वावडिंग, नागरमोथे, हिरड्याची साल, हे जिन्नस समभाग घेऊन वस्त्रगाळ चूर्ण करून बकरीच्या मूत्रांत तीन दिवस खलून गोळ्या करून सुकवाव्या. या गोळीचें गोमुत्रांत घांसून अंजन करावें ह्मणजे तिमीररोगाचा नाश होतो. मात्र अन्न

शतांधळें जात नाहीं. पाण्यांत अंजन केलें असतां डोळ्यांतील कांच दूर होतो. मद्यांत अंजन केलें असतां डोळ्यांतील पटल दूर होतें. स्त्रीच्या दुधांत अंजन केलें असतां फुल्यांचा नाश होतो. याचें गुणाचें प्रमाण तिमिर ( शतांधळें ) शेंकडा ७२; कांचबिंदु शेंकडा ८५; पटल शेंकडा ७७; फुलें शेंकडा ९१.

### ३० पुष्टिकरण चूर्ण.

जेष्टमध, भुईकोहळा, दालचिनी, लवंग, गोखरू, गुळवेल, सफेदमुसळी, हीं सर्व औषधें समभाग घेऊन चूर्ण करावें. तें चूर्ण नित्य ३ मासे प्रमाण अर्धा शेर दुधाशीं घ्यावें म्हणजे सदासर्वकाळ पुरुषाचे अंगांत बल राहतें. शेंकडा गुण ९०.

### ३१ मधुयष्टि चूर्ण

जेष्टमध, गुळवेल, त्रिफळा, भुईकोहळा, सफेदमुसळी, शहामुसळी, नागकेशर, शतावरी, हीं सर्व समभाग घेऊन वस्त्रगाळ चूर्ण करावें. नंतर तूप व मध विषम भागानें घेऊन त्यांत हें चूर्ण ४ मासे मिळवून भक्षण करावें. दिवस २५. म्हणजे वृद्ध पुरुषही तरुण होतो. ( म्हणजे तरुणाप्रमाणें वृद्ध पुरुषाच्या अंगांत रतिविषयी शक्ति उत्पन्न होते. ) याचा गुण शेंकडा ८५ आहे धातुक्षीणता व अशक्तपणा यांवर आम्हास उत्तम गुण दिसून आला. भुईकोहळा मात्र उत्तरा नक्षत्रांत काढलेला असावा.

### ३२ कामदेव मोदक.

गोखरू ४ तोळे, कवच बीज ८ तोळे, नागदळमूळ

( गंगेरनची साल ) ४ तोळे, शतावरी ४ तोळे, भुईकोहळा ८ तोळे, चिकणामूळ ८ तोळे, काकडीचें बीज ६ तोळे, आस्कंद १२ तोळे, दालचिनी, पत्री, वेलची, पिंपळी, आवळकाठी, लवंग, नागकेशर, वंशलोचन, जटामांसि, काळी मुसळी, गुळवेल, रक्तचंदन ह्या सर्व औषधी प्रत्येकीं १०।१० मासे घेऊन चूर्ण करावें. यास काटेसावरीच्या मुळीच्या रसाच्या २१ भावना द्याव्या. कुश आणि दर्भ यांच्या रसाच्या २१ भावना द्याव्या. नंतर समान साखर मिळवावी किंवा साखरेचा पाक करून त्यांत वरील जिनसा मिळवून एकजीव करून ठवावा. हा पाक बलाबल पाहून १ तोळ्या पासून २ तोळे पर्यंत प्रत्येकवेळीं घ्यावा. म्हणजे नष्ट शुक्र, मूत्रकृच्छ यांचा नाश होतो. पूर्ण वाजीकरण होतें. धातु पुष्ट होते. याचा गुण शेकडा ९८ आहे.

## ३३ नारसिंह चूर्ण.

शतावरी १ शेर, गोखरू १ शेर, डुकरकंद १। शेर, गुळवेल सत्व १॥ शेर भिलावा चूर्ण २ शेर, चित्रकसाल २॥ पाव, काळे तीळ १ शेर, सुंठ, मिरें, पिंपळी यांचें चूर्ण -॥- शेर, साखर ४॥ शेर, मध २। शेर, गोघृत १ शेर -॥- पाव. यांचें चूर्ण करून राखलेल्या तुपाच्या मडक्यांत ठेवावें. दररोज २ तोळे चूर्ण खाऊन इच्छेप्रमाणें भोजन करावें. एक महिना सेवनानें जरा दूर होऊन रोगमुक्त होतो. शरीर बलिष्ट होतें. उष्णता निघते, मेह, पांडु, पिनस, अष्टादश कुष्ट, आठ उदररोग, भगंदर, मुत्रकृच्छ, गृध्रसी, हलिमक, क्षय, महाश्वास, पांचप्रकारचे खोकले, ८० प्रकारचे वातरोग, ४० प्रकारचे पित्त-

रोग, २० प्रकारचे कफरोग, सन्निपात, सर्व प्रकारच्या मुळव्याधी, इत्यादि रोग याच्या प्रभावानें इंद्रवज्राप्रमाणें गुण देतात. सुवर्णासमान देहकांती होते. पराक्रम ( सिंहाप्रमाणें ) वाढतो. अश्वाप्रमाणें वेगवान होतो. शत-स्त्रियांशीं रती करण्याचें सामर्थ्य, गृध्राप्रमाणें तीव्र दृष्टि, नृसिंहासमान पुत्र उत्पन्न होतो. हें नारसिंहचूर्ण मनुष्याच्या सर्व रोगाचा नाश करितें. यापासून आह्मास आलेला गुणः—

मेह, पांडु, पिनस शेंकडा ३२. कुष्ठरोगांवर २१. उदररोग ५२; भगंदर ३९; मूत्रकृच्छ्र ७८; गृध्रसी गुण नाहीं. हलीमक ६८; क्षय ७४; महाश्वास ३३; खोकले ४८; वातरोग ७७; सर्वच वातरोग बरे होत नाहींत; पित्तरोग ८८; कफरोग ६०; सन्निपात यावर गुण नाहीं. परंतु ज्वरावर ९८ गुण आला. मूळव्याधीवर २०; शरीरास तेज, बळ, शक्ति उत्तम येते. डोळ्यांस तेज येतें. रती करण्याचें सामर्थ्य चांगलें उत्पन्न होतें. याप्रमाणें मात्र चांगला गुण येतो. वरील अतिशयोक्तीप्रमाणें आह्मास गुण दिसला नाहीं.

### ३४ लशूनवटी.

लसूण ४०० तोळे, काळे तीळ १६ तोळे, हिंग, त्रिकटु, दोन क्षार, पंचलवणें, शोफ, कोष्ठ, पिपळामूळ, चित्रक, अजमोदा, ओंवा, धणे ह्या जिनसा प्रत्येकीं ४ तोळे घेऊन सर्वांचें चूर्ण करून तुपाच्या राबलेल्या मडक्यांत तोंड बांधून सोळा दिवस पर्यंत ठेवावें. नंतर त्यांत तिळाचें तेल शिंपडून ३२ तोळे कांजी मिळवावें.

व एक जीव करावा. यांतील औषध १ तोळा प्रमाण भक्षण करावें व वर पाणी प्यावें. ह्मणजे आमवात, सर्वांगवात, एकांग वात, अपस्मार, अग्निमांद्य, कास, श्वास, उदर, उन्माद, शूल इत्यादि विकार हटकून दूर होतात; याचा गुण शेंकडा आमवातावर ८७; सर्वांग वातावर ४२, एकांग वातावर गुण नाहीं. अपस्मार २३; कास, श्वास, उदर, शूल ७७

### ३५ आम्लपित्तनाशक पाक.

त्रिकटु, त्रिफळा, चाका, जिरें, धणे, कोष्ट, अजमोदा, कडूजिरें, कायफळ, नागरमोथा, वेलची, जायफळ, जठामांसी, तेजपान, तालीसपत्र, केशर, नागकेशर, आंबा, कचोरा, मेष्टमध, लवंग, रक्तचंदन, या सर्वांचें समभाग चूर्ण करून त्या चूर्णाबरोबर सुंठीचें चूर्ण, दुप्पट खडीसाखर, व गाईचें दूध चौपट यांचा पाक करावा. त्यांतील एक तोळा प्रमाण गाईच्या दुधाबरोबर किंवा पाण्या बरोबर भक्षण करावा. ह्मणजे आम्लपित्त, अरुचि, शूल, हृद्रोग, ओकारी, कंठांतील जळजी, हृदयांतील दाह, मस्तकशूळ, अग्निमांद्य, पाठीचा शूल, कुक्षिशूळ, बस्तिशूळ, गुदरोग, इत्यादि रोगांचा नाश होतो व बळ व पौष्टिकता वाढते. परंतु विशेषें करून आम्लपित्त, मूत्रकृच्छ, ज्वर, व भ्रम यांचा हटकून नाश होतो. याचे गुणाचें प्रमाण आम्लपित्तावर शेंकडा ८३, मूत्रकृच्छावर ४६, ज्वर व भ्रमावर ९० व इतर रोगांवर ७७ आहे.

### ३६ गुग्गुळ पाक.

जवखार, देवदार, सैंधव, नागरमोथा, विलायची, वे-

खंड, ओंवा, सुंठ, मिरें, पिंपळी, अजमोदा, हवब, त्रिफळा, जिरें, कदुजिरें, वावडिंग, चित्रक ह्या जिनसा प्रत्येकीं एक तोळा; यांचें सूक्ष्म चूर्ण करावें. नंतर त्यांत शुद्ध गुग्गुळ २० तोळे व खडी साखर २० तोळे व तूप २० तोळे (तापलेलें) ह्या सर्वांचा पाक करून ४ मासे प्रमाण गोळ्या कराव्या. त्या गोळ्यांच्या भक्षणानें वातरक्त, उदर, भगंदर, प्लीहा, यक्ष्मा, विषमज्वर, शोष, पांढरें कोड, सर्व प्रकारचे व्रण, चित्तविभ्रम, अग्निमांद्य, गृध्रसी, अर्श, कोठ्यांतील रोग, इत्यादि रोगांचा शीघ्र नाश होतो. याजवर खाण्यापिण्याचा कांहीं निषेध नाहीं. याचें गुणाचें प्रमाण शेंकडा वातरक्तावर गुण नाहीं; उदर भगंदरावर ३२, यक्ष्मा, विषमज्वर ७३, पांढरे कोडावर गुण नाहीं, व्रणावर थोडाबहुत गुण येतो. चित्तविभ्रम, अग्निमांद्य, गृध्रसी, अर्श, कोठ्यांतील रोगांवर ८४, वातरोगांवर याचा विशेष उपयोग होतो. शेंकडा ९० गुण येतो.

### ३७ अगस्ति गुटिका.

हरीतकी ४० तोळे, व कुचल्याच्या बिया ४० तोळे, ह्या बेहड्याच्या काढ्यांत शिजवाव्या. आणि त्यांत सुंठ, मिरें, पिंपळी, जवखार, टांकणखार, ओंवा अजमोदा, खुरासनी ओंवा, वावडिंग, हिंग, सैंधव, बिडलोण आणि वांगडखार प्रत्येक १२ तोळे या सर्वांचे चूर्णास लिंबुरसांत खल करून लहान बोराएवढी गोळी करावी आणि द्यावी म्हणजे शूल, गुल्म, कृमि, अग्निमांद्य, प्लीहा व आमवात यांचा नाश होतो. याचा गुण वर लिहिलेल्या रोगांवर शेंकडा ८९ आहे.

## ३८ मुस्तादि चूर्ण.

नागरमोथे, इंद्रजव, कोंवळें बेलफळ, लोध्र, मोचरस, आणि धायटीफूल, हीं सहा औषधें समभाग घेऊन त्यांचें चूर्ण करून तें ताकांत गूळ मिळवून त्यांत मिसळून द्यावें. तेणेंकरून घोर अतिसार दूर होतात. मात्र शोथातिसार, सन्निपातातिसार हे दूर होत नाहींत. याचा गुण शेंकडा ७८ आहे. रक्तातिसारावर मात्र ४२ गुण आला.

## ३९ अभयादि गुटिका.

हरीतकी, सैंधव वाहव्याचा मगज, व कडू इंद्रावणाचा गीर हीं सर्व एकत्र करून मर्दन करावीं आणि लोखंडाच्या भांड्यांत भरून चुलीवर ठेऊन मंदाग्नीवर पचन करून लहान बोराएवढी गोळी करावी. ती गरम पाण्याशीं दोष पाहून द्यावी. या गोळीनें कोठ्यात सांचलेला आम ( आंव ) झडतो. पथ्याला दहींभात द्यावा. याचा गुण शेंकडा ९९ आहे.

## ४० अनुवासन तैल.

गुळवेल, एरंडमूळ, करंजमाल, भारंगी, अडूळसा, रोहीषगवत, शतावरी, कोन्हाटामूळ, इंद्रावणमूळ, किंवा कावळी नांवाची वनस्पति हीं नऊ औषधें चार चार तोळे, व जव, उडीद, आळशी, बोरीचें बीज, आणि कुळिथ हीं आठ आठ तोळे, हीं सर्व औषधें थोडीं कुटून त्यांत पाणी १०० शेर ( ४० तोळे म० शेर ) घालून चौथाई काढा करावा. त्यांत साडेसहा शेर तिळांचें तेल घालावें. आणि त्यांत आस्कंद ८ तोळे, भुईकोहळा ८ तोळे,

जेष्टमध १२ तोळे, हरणवेल ४ तोळे, रानमूग ४ तोळे, रानउडीद ४ तोळे, बारीक वांटून चूर्ण करून त्या तेलांत घालून फिरून कढवावें. सर्व काढा आटून तेल राहिलें ह्मणजे तें तेल गाळून घ्यावें. हें तेल संपूर्ण वायूचे रोग दूर करितें. ज्वराचा नाश होतो; व शरीरकांती उत्तम होते. याचा गुण फारच चमत्कारिक आहे. शेंकडा प्रमाण ९७ आहे.

## ४१ कुटजावलेह.

कुड्याची साल १०० तोळे घेऊन थोडी कुटून १९१ तोळे पाण्यांत टाकून चवथाई पाणी राहीपर्यंत काढा करावा. नंतर तो काढा गाळून त्यांत लाजेरी, धायटीफूल, कोंवळें बेलफळ, पाहाडमूळ, मोचरस, नागरमोथे, अतिविष, हीं सात औषधें एक एक तोळा घेऊन चूर्ण करून त्या काढ्यांत टाकून फिरून कढवून पळीला लेप लागे असा घन करावा. हा लेह पाण्यांत अथवा शेळीच्या दुधांत किंवा मंडांत घेतला असतां यापासून नानातऱ्हेच्या रंगाचे वेदनायुक्त मोठे भयंकर असे अतिसार बंद होतात. स्त्रियांची सर्व प्रकारची धुवणी ( प्रदर ), संपूर्ण मुळव्याधी, प्रवाहिका, हे सारे रोग जातात. याच अवलेहांत आफ्री, अफू, केशर, मुरडशेंग, जायफळ तोळा तोळा टाकून चण्याप्रमाणें गोळ्या करून वरील रोगांवर दिल्या त्यापासून मनाजोगा गुण आला. या गोळ्यांनी मात्र मूळव्याध गेली नाहीं. वरील अवलेहाचें शेंकडा प्रमाणः– अतिसार शेंकडा ९४. धुपणी शेंकडा ७६;

मुळव्याध शेंकडा ६३; प्रवाहिका शेंकडा ८७; गोळ्याः— अतिसार शेंकडा ९८.

## ४२ पाठादि तैल.

पहाडमूळ, हळद, दारुहळद, मोरवेल, अभावी, शेवग्याची साल, पिंपळी, जाईचा पाला, दांतीमूळ, हीं सात औषधें समभाग घेऊन त्यांचा कल्क करून त्याचे चौपट तिळांचें तेल घेऊन त्यांत तो कल्क मिळवून कल्काचा पाक होण्यासाठीं तेलाचे चौपट पाणी घालून तेल शेष राहीपर्यंत पाक करून तेल गाळून घ्यावें. हें तेल नाकांत घातलें असतां दुष्ट पिनसरोग जातो. याचा गुण शेंकडां ६९ आहे.

## ४३ करंजबीजवार्ति.

करंजाचे बियांचें बारीक चूर्ण करून त्याला पळसाच्या फुलांचा स्वरस काढून त्याच्या २१ भावना द्याव्या किंवा काढ्याच्या २१ भावना द्याव्या. चांगला खल करून लांबोळ्या गोळ्या कराव्या. ती गोळी रेणुकबीजाइतकी पाण्यांत उगाळून अंजन करावें ह्मणजे डोळ्यांतील शुक्र, ( फूल ) मांसवृद्धि, वडस व भूर इत्यादि रोग शस्त्रानें कापून काढल्याप्रमाणें झरून जातात. याचा गुण शेंकडा ६२ आहे.

## ४४ पुनर्नवादि योग.

पुनर्नवा ( पांढऱ्या वसूचें मूळ ) दुधांत उगाळून डोळ्यांत अंजन केलें असतां डोळ्यांची कंडू जाते, मधांत उगाळून अंजन केलें असतां डोळ्यांचा श्राव बंद होतो, तुपांत

उगाळून अंजन केलें असतां फुलें जातात, तेलांत उगाळून अंजन केलें असतां तिमिररोग जातो. कांजींत उगाळून अंजन केलें असतां रातांधळें जातें. पुनर्नव्याचा काढा करून त्यांत मध व बेलाचा रस मिळवून प्राशन केला असतां, सर्वप्रकारची आंगावरील सूज लवकर ओसरते. पुनर्नवा, देवदार, गुळवेल, पहाडमूळ, सुंठ, गोखरू, हळद, दारुहळद, रिंगणी, डोरली, पिंपळी, चित्रक, अडूळसा यांचें चूर्ण गोमुत्राबरोबर प्यावें. ह्मणजे बहुतप्रकारचा सर्वांग व्यापून राहिलेला शोथ ७ दिवसांत नाश पावतो. याचा गुण शेंकडा नेत्ररोगांवर ८७ आणि सुजेवर ९६ आहे.

## ४५ प्रमेहदर्पास्त्र गुटिका.

वंशलोचन, वेलदोड्यांतील दाणे, वावडिंग, नागकेशर, रेवाचिनी, दारुहळद, कंकोळ, पांढरा चंदन यांचें वस्त्रगाळ चूर्ण करून तें चंदनी तेलांत खलून बोरांतील आंठळीएवढ्या गोळ्या कराव्या, सावलींत सुकवाव्या. एक गोळी पळसाच्या फुलांचा व दारुहळदीचा कषाय करून त्यांत खडीसाखर मिळवून त्याबरोबर गिळावी. या प्रमाणेंच अस्तमानीं करावें ह्मणजे तिडिक एक दिवसांत बंद होते. रक्तप्रमेह, पूयप्रमेह, आदीकरून सर्व परमे बरे होतात. याचा गुण शेंकडा ८९ आहे.

## ४६ अर्कमूळादि काढा.

रुईचें मूळ, पिंपळमूळ, शेवग्याची साल, देवदार, चवक, निर्गुडी, पिंपळी, रास्ना, माका, पुनर्नवा, चित्रक, वेखंड, चिराईत व सुंठ यांचा अष्टमांश काढा करावा.

तो सर्व त्रिदोषज्वर, सर्व सन्निपातज्वर, प्रसूतिवायु, बाळंतरोग, नाना प्रकारचें शैत्य व अपस्मार यांचा त्वरित नाश करितो. याचा गुण शेंकडा त्रिदोषावर ७७, सन्निपातावर ६१, प्रसुतिवायू व बाळंतरोगावर ८७, शैत्यावर ९२, अपस्मारावर शेंकडा ४९ गुण आला.

## ४७ अष्टादशांग काढा.

चिराईत, देवदार, दशमुळें, सुंठ, नागरमोथे, कुटकी, इंद्रजव, धणे व गजपिंपळी यांचा अष्टमांश काढा करून दिल्यानें झांपड, बडबड, खोकला, अरुची, दाह, मोह, दमा यांनींयुक्त सर्व ज्वरांचा नाश करितो. याचा गुण शेंकडा ९८ आहे.

## ४८ वज्रक्षार.

पादेलोण, जवखार, मीठ, बांगडखार, सैंधव, टांकणखार, व सज्जीखार हे समभाग एकत्र करून त्यांचें चूर्ण रुईच्या व निवडुंगाच्या चिकांत भिजवून तीन दिवस उन्हांत ठेवावें. नंतर त्याचा रुईच्या पानास लेप देऊन तीं पानें मडक्यांत भरून संधिलेप करावा व मातकापड करून मध्यम पूट द्यावें. स्वांगशीत झाल्यावर काढून चूर्ण करून त्यांत त्याचे निमे सुंठ, मिरीं, पिंपळी, वावडिंग, मोहऱ्या, त्रिफळा, चवक, व भाजलेला हिंग मिळवावा. हा अग्नि व बल पाहून ताकाशीं द्यावा. ह्मणजे सर्व प्रकारचे उदररोग, सूज, गुल्म, अष्टिला, अग्निमांद्य, अरुची, प्लिहा, यकृत यांचा हटकून नाश होतो. याचें घेण्याचें प्रमाण तीन माशांपासून आहे. याचा गुण शेंकडा ९० प्र. येतो.

## ४९ प्रमेहहारक गुटी.

भीमसेनी कापूर १ मासा, कस्तुरी १ मासा, अफू ४ मासे जायपत्री ४ मासे, या सर्वांचा नागवेलीच्या पानाच्या रसांत खल करावा. गुंज प्रमाण गोळी करावी. नित्य एक गोळी खडीसाखर व दूध यांचे बरोबर घ्यावी. ह्मणजे प्रमेह ( सर्व प्रकारचे ) दूर होतात. आणि वीर्यस्तंभन होतें. याचा गुण शेंकडा ८० आहे.

## ५० आर्द्रकावलेह.

जुनागूळ २० तोळे, आल्याचा रस ८० तोळे, या दोहींचें मिश्रण विस्तवावर हलक्या आंचेनें पक्क करावें. नंतर त्यांत दालचिनी, पत्री, नागकेशर, विलायची, लवंग, सुंठ, मिरें, पिंपळी या जिनसा प्रत्येकीं १ तोळा घेऊन त्यांचें बारीक चूर्ण करावें. तें वरील पाकांत मिळवून ठेवावें. तो अवलेह दररोज ६ मासे प्रमाण भक्षण करावा. ह्मणजे राजयक्ष्मा, मंदाग्नि, कास, श्वास. अरुची यांचा हटकून नाश होतो. याचें गुणाचें प्रमाण शेंकडा ८७ आहे. यानें राजयक्ष्मा, निर्मुळ जात नाहीं. क्षयाचा खोकला व श्वास यांवर मात्र चांगला गुण येतो.

## ५१ खदिरसार गुटिका.

खैराची साल, जायफळ, भीमसेनी कापूर, दक्षिणी सुपारी, तज, पत्री, नागकेशर, विलायची, कस्तुरी ह्या जिनसा समभाग घेऊन खैरसालीच्या काढ्यांत खल करावा. चण्याप्रमाणें गोळी करावी. एक गोळी रात्रीं निजण्याचे वेळीं तोंडांत धरावी. ह्मणजे जीभ, दांत, ओंठ,

मुख, गळा, ताळू इत्यादि ठिकाणचे रोग त्वरित नाश पावतात. याचा गुण शेंकडा ७० आहे.

### ५२ कांचनादि काढा.

कचनारचे सालीचा काढा करून त्यांत सुंठीचें चूर्ण घालून २१ दिवस प्यावा ह्मणजे गंडमाळेचा नाश होतो. याचा गुण शेंकडा ८८ आहे. याच सालीच्या काढ्यानें गंडमाळेच्या जखमा धुवाव्या आणि शेकाव्या.

### ५३ पटोलादि काढा.

कडु पडवळ, बेहडा, हिरडा, आवळकाठी, कडुनिंबाची साल, चिराईत, खैरसाल, बिवळा साल, बेलाची साल, यांचा अष्टमांश काढा करून त्यांत गुग्गुळ तीन मासे प्रमाणें मिळवून प्याला असतां ९ दिवसांत सर्व प्रकारचे उपदंश ( गर्मी ) रोग जातात. याचा गुण शेंकडा ९१ आहे. याजवर पथ्यः-तुरीचें वरण, पोळी, तूप बाकी वर्ज्य.

### ५४ वचादि काढा.

वेखंड, अक्कलकारा, पिंपळाचें मूळ, मालकांगोणी, उंबराचें मूळ या औषधांचा अष्टमांश काढा करून तो काळ्या गाईच्या दुधांत किंवा मेंढीच्या दुधांत मिश्र करून द्यावा आणि नाकांत हत्तीच्या किंवा उंटाच्या मूत्राचे ९ थेंब सोडावे. ह्मणजे ७ दिवसांत हटकून अपस्मार, ( मिरगी, घुरें फेंफरें ) या रोगाचा नाश होतो.

या विकाराचे आमचेकडे ३४ रोगी आले त्यांपैकीं १३ निःशेष चांगले झाले. ९ साधारण बरे झाले आणि ७ रोग्यांना गुण येऊन ९ महिन्यांनीं पुनः रोगोद्भव

झाला. याच उपायानें त्यांचा रोग गेला, याचा शेंकडा गुण ६४ आहे.

## ५५ क्षारपंचक.

तीळ, आघाडा, केळें, पळस, व जव यांचा क्षार काढून ता प्रत्येकीं १।२ गुंजा घेऊन, गोखरू, पांढरा वसू, ज्येष्टमध, पाषाणभेद, ( घनफोड ) पळसाचीं फुलें यांचा काढा करून तो काढा १ तोळे यांत वरील क्षार मिळवावें. आणि प्राशन करावें ह्मणजे मूतखडा, उन्हाळी, मूत्र बंद होणें, मूत्र शर्करा. शुक्राश्मरी यांचा हटकून नाश होतो. याचा गुण शेंकडा ८७ आहे.

## ५६ पपईयोग.

एरंडपपईचें मूळ ४ तोळे काढून रात्रीं ८ तोळे पाण्यांत भिजत घालावें. प्रातःकाळीं त्याच पाण्यांत वांटून वस्त्रगाळ करून त्यांत जवखार १ मासा मिळवून प्राशन करावें ह्मणजे ७ दिवसांत मूत्राश्मरी ( मूतखडा ) झरून पडतो. याचा गुण शेंकडा ६८ आहे.

## ५७ मुखपाकहरणचूर्ण.

ज्येष्टमध, रक्तचंदन, वाळा, अतिविष, दुर्वा, पांढरा सुवासिक चंदन, देवदार, वंशलोचन, कंकोळ आणि भीमसेनी कापूर, प्रत्येकीं अर्धा अर्धा तोळा घेऊन त्यांचें बारीक चूर्ण करून ठेवावें. हें चूर्ण आणि समभाग मध मिळवून तें मिश्रण जिभेस व तोंडास लावावें ह्मणजे जिभेवरील, घशांतील, व तोंडांतील ठिकठिकाणीं पडलेले चट्टे, चिरा आणि तोंडांतील सर्व प्रकारचे उष्णतेचे रोग ह्मणजे

ज्यांच्या योगानें, खाणें, पिणें, बोलणें, गिळणें हें बरोबर होत नाहीं अशा अनेक प्रकारच्या मुखरोगांचा तीन किंवा पांच दिवसांत हटकून नाश होतो. याचा गुण शेंकडा ९९ आहे.

## ५८ कामदेव चूर्ण.

सफेद मुसळी, गुळवेलीचें सत्व, कवचबीज, गोखरूं, सावरीचीं मुळें, खडीसाखर, आवळकाठी, पंजाबी साळम, मदनमस्त, आस्कंद यांचें चूर्ण करून तें १० मासेप्रमाण गाईचे दुधांत तूप व खडीसाखर हें चूर्ण घालून प्यावें ह्मणजे नवीन शूक्रधातु उत्पन्न होते व संभोगाची इच्छा वाढते. ७ दिवसांत पूर्ण गुण अनुभवास येतो. याचा गुण शेंकडा ९९ आहे.

## ५९ अश्वत्थयोग.

पिंपळाच्या पानांच्या अग्रांचा रस १ भाग, रक्तचा-बोळ १ भाग, आणि मध १४ भाग एकत्र करून तो तीन माशांपासून १ मासेपर्यंत पोटांत द्यावा. ह्मणजे वांतींतन रक्त जात असलेलें किंवा हृदयांत सांचलेलें रक्त दूर होतें. याचा गुण शेंकडा ८९ आहे.

## ६० अष्टांग तैल.

काड्या निवडुंग, एरंड, बकाणनिंब, निर्गुंडी, मुंगना ( शेवगा ) कचोरा, काळा धोत्रा, काळी टाहकळ यांच्या पानांचा रस काढून त्यांत चौथाई तिळाचें तेल टाकून पक्क करावें. नंतर त्यांत सुंठ टाकावी. सर्व रस जळाल्या-वर तेल शिल्लक राहिलें ह्मणजे उतरावें व गाळून ठेवावें.

या तेलाचें मर्दन केल्यानें सर्व प्रकारचे वायूरोग नाश पावतात. याचा गुण शेंकडा ८८ आहे.

## ६१ वृद्धचिंतामणी चूर्ण.

खुरासनी ओंवा, सफेद जिरें, अजमोदा, काकडसिंगी, आस्कंद ह्या जिनसा समभाग घेऊन वस्त्रगाळ चूर्ण करावें. तें भस्म एक मासा प्रमाण पाण्याशीं द्यावें ह्मणजे सर्व प्रकारचे वायू, श्वास, खोकला, प्रलाप, अतिनिद्रा, अरुचि इत्यादि विकार हटकून दूर होतात याचा गुण शेंकडा ६९ आहे.

## ६२ आमवातारि गुटिका.

मोठ्या हिरड्याच्या फळावरील साल, सेंधेमीठ, निशोतर, इंद्रावणाची मुळी, सुंठ, इंद्रावणाच्या फळांतील गीर, यांचें बारीक चूर्ण करून तें चूर्ण लोखंडाच्या कढईंत टाकून त्याच्या १६ पट पाणी त्यांत घालून ती कढई अग्नीवर ठेवावी. पाणी आटल्यावर त्या चूर्णाच्या लहान बोरा प्रमाणें गोळ्या कराव्या. त्यांपैकीं एक गोळी गरम पाण्याशीं द्यावी. आणि वर तूप जास्त घालून अशा भातानें भोजन करावें ह्मणजे आमवाताचा हटकून नाश होतो, ( तूपभात न खाल्यास अतिशय जुलाब होतात ते तूप खाल्यानें बंद होतात. ) याचा गुण शेंकडा ९१ आहे.

## ६३ अहिफेनयोग.

जायफळ कोरून त्यांत अफू घालून तें जायफळ वडाच्या किंवा बाभळीच्या झाडास भोंक पाडून त्यांत ठेवावें. त्याजवर त्याच लाकडाचा चुरा बसवावा. वर चिख

ल वगैरे लावावा. १९ दिवसांनीं तें जायफळ काढून अफू सद्धां त्याचा उंबराचे दुधांत खल करावा व गुंज प्रमाण गोळ्या कराव्या. एक गोळी भक्षण करून वर खडीसाखरयुक्त आटीव दूध प्राशन करावें ह्मणजे धातूचा स्तंभ होतो. उतार निंबू चोखावें. याचा गुण शेंकडा ९९ आहे.

## ६४ ज्वालानलरस.

जवखार, सज्जीखार शुद्ध टांकणखार, शुद्ध पारा, शुद्ध गंधक, पिंपळी, पिंपळमूळ, चवक, चित्रक, सुंठ, ह्या सर्व जिनसा समभाग आणि या सर्वांबरोबर भाजलेली भांग आणि भांगेच्या अर्धा भाग शेवगामूळ घेऊन चूर्ण एकत्र करावें त्यास भांगेच्या रसांत, शेवग्याच्या रसांत, चित्रकाच्या रसांत ( काढ्यांत ) एक एक दिवस खल करून उन्हांत सुकवावें. त्या चूर्णास एका कोऱ्या मडक्यांत ठेवून मुख बंद करून कापडमाती करावें, आणि अग्नि द्यावा ( गजपूट ); नंतर काढून त्यास आल्याच्या रसाचीं ७ पुटें द्यावीं व गुंजप्रमाण गोळ्या कराव्या. त्या पैकीं १ किंवा २ गोळ्या मधांत उगाळून घ्याव्या व वर गुळवेचा काढा करून घ्यावा. ह्मणजे तात्काळ सर्व अजीर्णाचा नाश होतो. विषूची, अतिसार, संग्रहणी, कफरोग, ओकारी, अरुचि इत्यादि विकार नाश पावतात. व क्षुधा प्रदीप्त होते. याचा गुण शेंकडा अजीर्णावर ९८, विषूची ७२, अतिसार ७८, संग्रहणी ६१, कफरोग ७८, ओकारी ९०, अरुचि ९८, क्षुधा प्रदीप्त ९८ याप्रमाणें आहे.

## ६५ काविळनस्य.

कडू दोडकीच्या वाळल्या फळाचें किंवा देवडांगरीच्या

वाळल्या फळाचें चूर्ण वस्त्रगाळ करून तें नाकांत ओढावें ह्मणजे कावीळ रोगाचा एक दिवसांत निश्चयानें नाश होतो. नाकांतून पिंवळा श्राव नस्याच्या योगानें वाहतो तो तूप गरम करून नाकांत सोडल्यानें बंद होतो. याचा गुण शेंकडा ९१ आहे.

## ६६ शंखवटी.

मोठा शंख फोडून त्याचे तुकडे करून एका कोऱ्या मडक्यांत घालून त्यांत निंबाचा रस तुकडे बुडे इतका टाकावा. नंतर मुख बंद करून मातकापड करावें आणि हलकें पूट द्यावें. याप्रमाणें २१ वेळ करावें ह्मणजे त्याचें शुभ्र भस्म होतें या भस्मांत चिंचेचा क्षार ६ मासे, काचलवण, ४ मासे, शेंदलवण ४ मासे, सुंठ ६ मासे. मिरीं ६ मासे, पिंपळी ६ मासे, भाजलेला हिंग ४ मासे, शुद्ध बचनाग १। तोळा, गंधक ४ मासे, पारा हिंगुळांतील ४ मासे, यांचें पारा व गंधक खेरीज करून चूर्ण करावें. नंतर पारा व गंधक यांची कज्जली करून त्यांत वरील सर्व जिनसा मिळवून आल्याच्या रसांत वाल प्रमाण गोळ्या बांधाव्या. एक गोळी लवंगेच्या काढ्याबरोबर घेतली असतां तात्काळ शुळाचा नाश होतो. अजीर्ण, अग्निमांद्य, विषूचिका, पान्थरी, यकृत यांचाही नाश होतो याचा गुण शेंकडा ९४.

## ६७ बिभीतक वृक्षयोग.

बेहड्याच्या वृक्षाची साल आणून ती सावलींत वाळवावी. त्या सालीचें चूर्ण ( सूक्ष्म ) करावें. तें एक तोळा चूर्ण गाईच्या दुधांत, तुपांत, गुळाबरोबर किंवा पाण्यांत

घ्यावयानें हृद्रोग, जीर्णज्वर, रक्तपित्त यांचा हटकून नाश होतो. याचा गुण शेंकडा ९३ आहे.

## ६८ गोक्षुरादि गुग्गुल.

चौदा तोळे गोखरूचा १९१ तोळे पाण्यांत अष्टमांश काढा करावा. त्यांत ३॥ तोळे गुग्गुळ टाकून तो पक्व करावा. नंतर त्यांत सुंठ ४ मासे, मिरें ४ मासे, पिंपळी ४ मासे, हिरड्याची साल ४ मासे, बेहड्याची साल ४ मासे, आवळकठी ४ मासे, नागरमोथे ४ मासे, सर्वांचें चूर्ण त्यांत टाकून त्याचा एकजीव करावा. नंतर ९ मासे प्रत्येक दिवशीं पाण्याबरोबर घ्यावा. ह्मणजे मूत्रकृच्छ, मूत्राघात, परमा, प्रदर, वातरक्त, वीर्यदोष, यांचा नाश होतो. याचा गुण शेंकडा ७८ आहे.

## ६९. षड्बिंदुतैल.

एरंडमूळ, तगर, सोंफ, हरणवेल, सेंधेमीठ, रास्ना, माका, वावडिंग, जेष्टमध, सुंठ, ह्या जिनसा समभाग यांच्या ८ पट तिळाचें तेल, चौपट माक्याचा रस, आणि तेलाच्या चौपट बकरीचें दूध या सर्वांस एकत्र करून कढईंत मंद आंचेनें पक्व करावें. पाणी जळल्यावर ( रस वगैरे ) तेल शेष राहिलें ह्मणजे गाळून शिशींत भरून ठेवावें या तेलाचे ६ बुंद निजतेसमयीं नाकांत घालावे. ह्मणजे सर्व प्रकारचे मस्तक रोग, आणि सर्व दंतरोग यांचा नाश होतो. याचा गुण शेंकडा ७९ आहे.

## ७० रोपणी गुटिका.

तिळाचीं फुलें ८०, पिंपळाचीं फळें ६०, चमेलीचीं

फुलें ५०, मिरें १६ यांचें बारीक चूर्ण करून तें पळ-साच्या फुलांच्या रसांत घोटून गोळ्या कराव्या. एक गोळी पाण्यांत उगाळून अंजन करावें. ह्मणजे तिमीर, अर्जुनरोग, फुलें, मांसवृद्धि, लाली, भूर, खुपऱ्या, यांचा नाश होतो. याचा गुण शेंकडा तिमीररोगांवर ८०, अर्जुन (अहिरा) रोगावर ९९, फुलांवर १२, मांसवृद्धी-वर ९९, लाली वगैरेवर ९९ आहे.

## ७१ द्वादशामृत हरीतकी.

हिरडा १ तोळा, बेहडा २ तोळे, आवळकाठी ४ तोळे, शतावरी १ तोळा, जेष्टमध ८ मासे, तज ८ मासे, सैंधमीठ, १। तोळा, पिंपळामूळ १। तोळा, खडीसाखर १२ तोळे याचें सूक्ष्म चूर्ण करून तें ८ मासे प्रमाण तूप व मध विषम भागानें घेऊन ४९ दिवस खावें ह्मणजे तिमीर, पटल, कांच, राताधळें, फूलें, नेत्रांतील पाण्याची गळती, सबल वायु इत्यादि सर्व नेत्ररोग दूर होतात. याचा गुण शेंकडा ६६ आहे. या प्रमाणानेंच जास्त चूर्ण करून ठेवावें.

## ७२ बिल्वक तैल.

शिरसाचें १६ तोळे तेल घेऊन त्यांत सुंठ, मिरें, पिं-पळी, कोष्ट, पिंपळामूळ, आघाड्याचा क्षार, जवखार, बेलाच्या मुळीचा रस, गोमूत्र, (यात सुंठापासून जवखारापर्यंत जिनसा ४।४ मासे प्रमाणे घ्याव्या ) बेलाच्या मुळीचा रस व गोमूत्र प्रत्येक ८ तोळे घ्यावें. सर्व जिनसा हलक्या आंचे-नें पक्क कराव्या. तेल राहिलें ह्मणजे गाळून ठेवावें. हें तेल कानांत टाकल्यानें बहिरेपणा, कानांतील शब्द, कान

वाढणें, कर्णशूळ इत्यादि रोगांचा नाश होतो. याचा गुण शेंकडा ९२ आहे.

## ७३ औदुंबरफलयोग.

उंबराचीं फळें आणून सावलींत सुकवावीं. त्यांचें वस्त्रगाळ चूर्ण करून तें चार मासे प्रमाण मध व खडीसाखर मिळवून घ्यावें. ह्मणजे ७ दिवसांत स्त्रियांचा धुपणी ( प्रदर ) रोग जातो. याचा गुण शेंकडा ९८ आहे.

## ७४ विजयसारयोग.

अर्जुनवृक्षाची साल, वेखंड, माळकामोणी, राई ( शिरस ) यांचें चूर्ण वस्त्रगाळ करून तें ४ मासे प्रमाण थंड पाण्यांत किंवा शिळ्या पाण्यांत प्यावें ह्मणजे पांच दिवसांत स्त्रियांना ऋतु प्राप्त होतो. विटाळ गेला तरी पुनः उत्पन्न होतो. आणि स्त्रियांचा वांझपणा जातो. या औषधाच्या चूर्णावर आह्मी काळे तीळ आणि गुळ यांचा काढा दिला त्यापासून आह्मांस शेंकडा ९६ गुण दृष्टीस पडला. नुसतें चूर्ण मात्र दिलें नाहीं.

## ७५ कामेश्वर गुटी.

केंशर ४ मासे, लवंग ८ मासे, जायफळ १ तोळा, अफू ११ मासे, कस्तुरी २ गुंजा यांचें बारीक चूर्ण करून मधांत खल करावा. दोन गुंज प्रमाण गोळी बांधावी. सायंकाळीं गोळी भक्षण करून वर आटीव दूध प्यावें. ह्मणजे काम प्रदीप्त होतो. धातूचा स्तंभ होतो. पुरुषांस व स्त्रियांस आनंद होतो. याजवर उतार निंबू चोखावें. याचें प्रमाण शेंकडा ९० आहे.

## ७६ विदारीकंदपाक.

भुईकोहळ्याचें चूर्ण २० तोळे तुपांत तळावें. बदाम मगज ४ तोळे, बेदाणा ४ तोळे, लवंग ४ तोळे, वेलची ४ तोळे, जायफळ ४ तोळे, गोखरूं ४ तोळे, कवच बी ४ तोळे, सफेदमुसळी ४ तोळे, शहामुसळी ४ तोळे, पंजाबी ४ तोळे, लसणी सालम ४ तोळे, यांचे बारीक चूर्ण करून चूर्णाच्या चौपट साखरेचा पाक करून त्यांत वरील चूर्ण मिळवून वड्या कराव्या. त्या शक्तिप्रमाणें सेवन करून वर गाईचें दूध प्राशन करावें. प्रमाण २ तोळ्यांपासून ४ तोळेपर्यंत द्यावें यानें पौष्टिकता उत्पन्न होते. बल वाढतें. धातू वाढून ती घट्ट होते. पुरुषत्व प्राप्त होतें व वाजीकरण होतें. याचा गुण शेंकडा ९४ आहे.

## ७७ तुळसीयोग.

काळ्या तुळशीच्या पानांचा अंगरस २ तोळे काढून त्यांत तीन मासे मध मिळवून द्यावा. ह्मणजे तिजारे चौथरे आदि सर्व विषमज्वर तीन दिवसांत नाश पावतात. याचा गुण शेंकडा ७१ आहे.

## ७८ अर्जुनवृक्षयोग.

अर्जुन वृक्षाचीं झाडें फार मोठीं असतात. त्यांस कांहीं ठिकाणीं अंजन किंवा आंजन ह्मणतात.

१ याचे सालीचें चूर्ण मधांत दिल्यानें हृद्रोग, रक्तपित्त, व जीर्णज्वर यांचा नाश होतो. याचा गुण शेंकडा ८९ आहे.

२ सालीचा अष्टमांश काढा करून तो दुधांत मिळवून

तें दूध खिरीसारखें आटवून प्राशन करावें. पित्त व हृद्रोग यांचा नाश होतो. याचा गुण शेंकडा पित्तावर ९८ व हृद्रोगावर ६९ आहे.

३ याचे साळीचा रस १ तोळा व तूप १ तोळा दोन्ही मिळवून तीन दिवस प्यावें ह्मणजे हृद्रोगासंबंधीं असाध्य हगवण दूर होते. याचा गुण शेंकडा ९९ आहे.

## ७९ अपामार्गयोग.

हीं झाडें पाऊसकाळांत सर्व देशांत उत्पन्न होतात त्यांस आघाडा असें ह्मणतात. ही फार उपयुक्त वनस्पति आहे.

विंचूचे दंशावर मुळी उगाळून लेप द्यावा व लेप सुकेपर्यंत शेकावें. ह्मणजे विंचूचें विष उतरतें. याचा गुण शेंकडा ७० आहे

२ कुत्र्याचे विषास याचें एक तोळा मूळ कुटून मधाशीं द्यावें. आणि कोरफडीचें पान व सैंधव दंशावर बांधावें ह्मणजे तीन दिवसांत विष उतरतें. याचा गुण शेंकडा ४२ आहे.

३ आघाड्याच्या क्षाराचें पाणी व पानांचा कल्क यांत तिळाचें तेल सिद्ध करावें. तें गाळून कानांत घालावें ह्मणजे कर्णनाद व बधिरत्व हे विकार जातात. याचा गुण शेंकडा ८४ आहे.

४ आघाड्याचें मूळ मधांत उगाळून अंजन करावें. ह्मणजे डोळ्यांतील फूल झडतें. गुण शेंकडा ७८ आहे.

५ आघाड्याच्या पंचांगाची जाळून राख करावी. ती

मधांत १ किंवा २ वाल द्यावी. कफाचा नाश होतो. याचा गुण शेंकडा ९० आहे.

६ आघाड्याची मुळी ताकांत उगाळून घ्यावी. ह्मणजे कावीळीचा ३ दिवसांत नाश होतो. गुण शेंकडा ९९.

७ याचें झाड उपटून मुळी कापून फेंकून द्यावी. नंतर झाडाचा रस काढून तो रस ४ तोळे, जिऱ्याची पूड नऊ मासे, घालून प्यावा. ह्मणजे ७ दिवसांत उपदंशाचा नाश होतो. उतार बोरीच्या किंवा जास्वंदीच्या पाल्याचा रस द्यावा ह्मणजे आग शमन होते. गुण शेंकडा ८०.

८ याचीं ४।५ पानें विड्यांत खावीं. ह्मणजे पोटशूळ शमन होतो. गुण शेंकडा ९१ आहे.

## ८० अडूळसाप्रयोग.

हीं झाडें बहुतेक देशांत उत्पन्न होतात. हें झाड मोठें असतें. त्यास पांढरीं फुलें येतात.

१ पानांचा फुलांसहित रस काढून तो रस दोन तोळे व मध ६ मासे एकत्र करून द्यावा ह्मणजे श्वास, कास, कफ क्षय यांजवर उत्तम गुण येतो. याचें प्रमाण शेंकडा ८० आहे.

( २ ) पानाचा रस आणि मध समभाग प्राशन करावा ह्मणजे रक्तपित्ताचा नाश होतो. गुण शेंकडा ७५.

( ३ ) याचे मुळीचा रस काढून ६ मासे देणें ह्मणजे श्वेत प्रदर, सोमरोग यांचा नाश होतो. गुण शेंकडा ६०.

( ४ ) अडूळसा, नागरमोथे, धमासा, सुंठ, भारंगमूळ यांचा काढा द्यावा ह्मणजे कफज्वराचा नाश होतो. गुण शेंकडा ९२.

## ८१ एरंडवृक्षयोग.

एरंडाचे वृक्ष प्रसिद्ध आहेत. हे बागांत लावतात.

( १ ) एरंडमुळाचा काढा, हिंग १ मासा व पादेलोण एक मासा घालून द्यावा. ह्मणजे शूळांचा नाश होतो याचा गुण शेंकडा ९९ आहे.

( २ ) एरंडाचे पानास लोणी अगर साजूक तूप लावून तें मस्तकावर बांधावें. ह्मणजे मस्तकांतील उष्णता निघते. याचा गुण शेंकडा ९८ आहे.

( ३ ) लाल एरंडाचा चीक डोळ्यांत घातल्यानें सारा व फुलें झडतात. याचा गुण शेंकडा ८४ आहे.

( ४ ) एरंडमूळ तुपांत उगाळून प्राशन करावें. व योनीस लेप याचाच द्यावा ह्मणजे स्त्री सुखानें प्रसूत होते. याचा शेंकडा ७२ गुण आहे.

## ८२ मालिनीवसंत.

घोड्याचे मूत्रांत कलखापरीचें चूर्ण २१ दिवस घालून ठेवावें. आणि उन्हांत ठेवून सुकवावें. नंतर तें चूर्ण ८ तोळे व पांढऱ्या मिऱ्याचें चूर्ण ४ तोळे, व हिंगुळ ८ तोळे या सर्वांचे एकत्र चूर्ण करून त्यांत गाईचें लोणी दोन तोळे घालून खलावें. नंतर १०० निंबाचे रसांत खल करावा. मात्रा १ वाल प्रमाण करून मध ३ मासे व पिंपळीचें चूर्ण एक मासा यांत द्यावी. ह्मणजे संग्रहणी, अतिसार, ज्वर, क्षय, मूळव्याध, ताप, शूळ, अग्निमांद्य, वातविकार, प्रदर, रक्तमूळव्याध, विषमज्वर व नेत्ररोग, यांचा नाश होतो. याचा गुण शेंकडा संग्रहणीवर ७४ अतिसारावर ८२. ज्वरावर ९८, क्षयावर ९९, मूळव्याधीवर

३८, विषमज्वरावर ६६, शूळावर ७८, अग्निमांद्यावर ९८, प्रदरावर ७९ नेत्ररोगांवर ९२.

## ८३ आम्रवृक्षयोग.

आंब्याचीं झाडें सर्वत्र प्रसिद्ध आहेत.

( १ ) रक्ती मुळव्याध व प्रदर यांवर आंब्याच्या कोईचें चूर्ण मधांतून द्यावें. ४ मासे चूर्ण व ६ मासे मध या प्रमाणें. याचा गुण शेंकडा ८५ आहे.

( २ ) आंब्याची अंतरसाल दह्यांत वांटून १ तोळा पर्यंत द्यावी. ह्मणजे दहा व अतिसार यांचा नाश होतो. याचा गुण शेंकडा ७४ आहे

( ३ ) आंब्याच्या चिकापासून गाळ होते तिचें ४ मासे चूर्ण साखर व तूप यांत द्यावें. याचा गुण शें. ९०.

( ४ ) सर्व प्रकारच्या उष्णतेवर आंब्याची अंतर साल, उंबराच्या मुळांवरील साल व वडाच्या पारंब्यांचा रस काढून त्यांत जिरें व खडीसाखर घालून द्यावें. गुण शेंकडा ८५.

## ८४ सांबरशिंग.

शिताफळीचा पाला बारीक वांटून त्याचा लांबट गोळा करून त्यांत सांबरशिंगाचा तुकडा मध्यभागीं ठेवावा. आणि त्यास रानशेणींचें पुट द्यावें. ह्मणजे त्याचें भस्म होतें. याचप्रमाणें टाकळीच्या पाल्यांतही भस्म होतें.

( १ ) हें अर्धा मासा भस्म एक तोळा तुपाशीं द्यावें. ह्मणजे वातशूळ शमतो. याचा गुण शेंकडा ८० आहे.

( २ ) हें भस्म १ मासा प्रमाण दुधांतून द्यावें ह्मणजे धातुशुद्धि होऊन धातुस्थानची कळकळ निघून जाते.

( ३ ) हें भस्म १ वाल मधांत दिल्यानें खोकला, दमा, क्षय, ग्रंथी, अपची व अंडवृद्धी यांचा नाश होतो. याचा गुण खोकला, शेंकडा ९०, दमा शेंकडा ६०; क्षय शेंकडा ४०; ग्रंथीं व अपचीवर गुण आला नाहीं. अंडवृद्धी शेंकडा ३० आहे.

## ८५ कृमिहारक गुटी.

वावडिंग, पळसपापडी, कपीला, डिकेमाली, किरमानी ओंवा, सिताफाचा पाला, नायीचा पाला, गिंधानचा पाला हे सर्व समभाग घेऊन त्यांचा खल करावा. गुंज प्रमाण गोळी करून ती वावडिंगाचे काढ्यांत द्यावी. कृमीचा नाश होतो, ज्वर, ओकारी, झांपड, हगवण, यांचाही नाश होतो याचा गुण शेंकडा ९८ आहे.

## ८६ गंधाररस.

नागरमोथे, मोचरस, लोध्र, धायटीफूल, बेलांतील गीर, इंद्रजव, आफू, शुद्ध पारा, शुद्ध गंधक, सर्व जिनसा समभाग घ्याव्या. प्रथम पारा व गंधक यांची कज्जली करावी. नंतर सर्व औषधीं बारीक चूर्ण करून मिळवाव्या व खलांत सूक्ष्म होईपर्यंत घोटावें. तें तीन गुंजा औषध ताकांत द्यावें. म्हणजे अतिसार, संग्रहणीं इत्यादि विकार दूर होतात. गुण शेंकडा ९२ आहे.

## ८७ क्षुद्बोधरस.

सुंठ १ भाग, मिरें २ भाग, पिंपळी ३ भाग, सेंधेलोण ४ भाग, शुद्ध गंधक ९ भाग, या सर्वांचें चूर्ण करून निंबूचे रसांत १० दिवस खल करून गुंज प्रमाण

गोळया कराव्या. यांतील एक गोळी प्रति दिवशीं भक्षण केली असतां क्षुधा उत्पन्न होते व वाढते. गुण शेंकडा ९९

## ८८ चंदनादि काढा.

पांढरा चंदन, पित्तपापडा, वाळा, कमळगड्डा किंवा कमळकाकडी, धणे, सोंफ, आवळकाटी ह्या सर्व जिनसा समभाग घेऊन साधारण चूर्ण करावें. त्यांतील एक तोळा चूर्ण घेऊन १६ तोळे पाणी घालून २ तोळे उरवावें. त्यांत मध तीन मासे व खडीसाखर ६ मासे मिळवून द्यावी. ह्मणजे दाह त्वरित दूर होतो. याचा गुण शेंकडा ९० आहे.

## ८९ खर्पर गुटी.

शुद्ध कलखापरी १ तोळा, हिराकस ३ मासे, मोरचूत दोन वाल, शिलाजित १ मासा ह्या जिनसा ११ लिंबांच्या रसांत खलून हरबऱ्या एवढी गोळी करावी. ती तुपांत मिळवून खावी, ह्मणजे उपदंश (गर्मी वा) नाश होतो. पथ्य-फक्त खिचडी व तूप बाकी सर्व पदार्थ वर्ज्य. याचा गुण शेंकडा ९२ आहे.

## ९० मार्कंडेय चूर्ण.

शुद्ध पारा, शुद्ध गंधक, शुद्ध हिंगूळ, शुद्ध टांकणखार, सुंठ, मिरें, पिंपळी, जायफळ, लवंग, तेजपान, एलची, चित्रक, नागरमोथे, गजपिंपळी, तगर, अभ्रकभस्म, धायटीफूल, अतिवीष, शेवग्याचें बीज, काटेसावरीचीं मुळें, अफू. या सर्व जिनसा समभाग घेऊन बारीक चूर्ण करावें. प्रति दिवशीं एक मासा प्रमाण साखरेशीं

भक्षण करावें, ह्मणजे संग्रहणी, अग्निमांद्य, यांचा नाश होतो धातुवृद्धि, वयवृद्धि, बळ आणि पुष्टी ( शरीर पुष्ट ) उत्पन्न होते. याचा गुण शेंकडा ९४ आहे.

## ९१ क्षारयोग.

तीळ, आघाडा, पळस, आवळी यांचें मूळ तोडून झाडें आणून तीं वाळवावीं. तीं जाळून त्यांचें भस्म करावें. तें भस्म पाण्यांत मिळवून तें पाणी वस्त्रानें गाळावें. गाळलेलें पाणी कढईत घालून खालीं अग्नि लावावा. पाणी आटलें ह्मणजे बुडास क्षार जमतो तो दोन गुंजा प्रमाण शेळीच्या मूत्रात द्यावा ह्मणजे मूत्रशर्करा ( खर ) आणि अश्मरी ( मूतखडा ) यांचा नाश होतो. गुण शेंकडा ८४.

## ९२ व्रणराक्षस तैल.

सोळा तोळे सिरसाचें तेल व आठ तोळे गाईचें तूप एकत्र करावें. त्यांत आठ तोळे काळ्या माक्याचा रस व ४ तोळे एरंडपत्राचा रस मिळवावा. त्या सर्व जिनसा अग्निवर रस आटेपर्यंत पचन कराव्या. नतर तेल गाळून त्यांत गंधक ९ मासे, शेंदूर ९ मासे, हरताळ ९ मासे. मनशीळ ९ मासे, हळद ९ मासे, गेरू ९ मासे, पारा व गंधक यांची कज्जली ९ मासे एकत्र करून पुनः तें तेल कढवावें. पाक झाल्यावर उतरून ठेवावें. याच्या मर्दनानें कंडू, विचर्चिका, खरूज, कुष्ठ, वातरक्त, सर्व प्रकारचे व्रण, विस्फोट, दद्रु, पांढरें कोड यांचा हटकून नाश होतो. याचा गुण शेंकडा ६९ आहे.

## ९३ कल्याणसुंदराभ्र.

वज्राभ्रकाचें भस्म ४ तोळे घेऊन त्यास आवळी, नागरमोथा, रिंगणी, शतावरी, ऊंस, बेल, टाकळा, सुगंधवाळा, अडूळसा, डोरली, सोनपडवळ, पाहाडमूळ, बेहडा यांच्या रसांत पृथक खल करावा. ( प्रत्येक वनस्पतीचा रस ४ तोळे घ्यावा. ) नंतर गुंज प्रमाण गोळ्या कराव्या. त्या अनुपानपरत्वें सर्व रोगांवर द्याव्या. ह्मणजे राजयक्ष्मा, धातुक्षय, शोष, कफ, पित्त, श्वास वाय, अरुचि, काप, शरीरशैथिल्य, सन, स्वरक्षय, अजीर्ण, उदर्द, शूल, प्रमेह, ज्वर, विष, उरोग्रह, पांडू, उचकी, कृशत्व, कृमि, बलनाश, आम्लपित्त, प्लीहा, आमय, हलीमक, रक्तगुल्म, तृष्णा, आमवात ग्रहणी विस्फोट, कुष्ट, ( काड ) नेत्ररोग, शिरोरोग, मूर्च्छा, ओकारी, विरसपणा यांचा लवकर नाश होतो हें औषध बल देणारें, धातुवर्धक, बुद्धिवर्धक असून रसादि सप्त धातु वाढविणारें आहे. याचा गुण सर्व रोगांवर शेंकडा ६४ पासून ९९ पर्यंत आहे.

## ९४ बालज्वरांकुश.

पिंपळी, येलिया, गुग्गुळ हे समभाग, लवंग ·।।· भाग, अतिवीष एक भाग यांचा आल्याच्या रसांत खल करून अर्धगुंज प्रमाण गोळ्या कराव्या त्या मधांत किंवा अंगावरील दुधांत देणें. याच्या योगानें मुलांचा ज्वर लवकर जातो, गुण शेंकडा ९१.

## ९५ त्रिफळाचूर्ण.

हिरडेदळ १ भाग, बेहडेदळ २ भाग, आवळकाठी

४ भाग यांचें चूर्ण करून त्या चूर्णास वावडिंग, खैर, हिरडा, बेहडा, आवळी यांच्या वृक्षाची साल, व माका या प्रत्येकाच्या रसाच्या पृथक पृथक सात सात भावना द्याव्या. तें चूर्ण सावलींत वाळवावें. त्यांतील चार मासे प्रमाण चूर्ण द्यावें.

( १ ) नेत्ररोगांस तूप व मध विषम भागानें घालून द्यावे यांत गुण शेकडा ९०.

( २ ) वातरोगास तिळाचे तेलांत, गुण शेंकडा ७२.

( ३ ) पित्तास तूप व साखर यांत, गुण शें. ९४.

( ४ ) कफास मधांत, गुण शेंकडा ८०.

( ५ ) प्रमेहास थंड पाण्यांत गुण शेंकडा ६८.

( ६ ) विषमज्वर व मंदाग्नि यांस उष्ण पाण्यांत. गुण शेंकडा ७५.

( ७ ) सर्व प्रकारचे कुष्टास खैराचे काढ्यांत. गुण शेंकडा ४२.

## ९६ गुळवेलसत्व.

निंबावरील किंवा बोरीवरील जाड गुळवेल आणून तिचे लहान लहान तुकडे करावे. ते पाण्यानें स्वच्छ धुवून टाकावे. नंतर ते दगडी खलांत चांगले चेंचून एका कल्हईचे भांड्यांत स्वच्छ पाणी घालून त्यांत तो कुटलेला कल्क चार घटका भिजत घालावा, नंतर त्याच पाण्यांत चांगला कुस्करून त्याचा चोथा पिळून टाकावा व खालीं राहिलेलें पाणी दुसऱ्या कल्हईच्या पात्रांत वस्त्रगाळ करून ठेवावें. ह्मणजे एक प्रहरानें सत्व तळास जमतें. नंतर वरचें पाणी ओतून खालीं राहिलेलें सत्व सावलींत वाळ-

वून ठेवावें. जशी गुळवेल जाड तसें सत्व जास्त निघतें. हें चार गुंजांपासून ८ गुंजांपर्यंत अनुपान योजून द्यावें. अनुपानें. ( १ ) तुपांत दिल्यानें वायूचा नाश होतो, गुण शेंकडा ६०. ( २ माखरेंत दिल्यानें पित्त शमतें. गुण शेंकडा ८४. ( ३ ) मधांत दिल्यानें कफाचा नाश होतो. गुण शेंकडा ९४. ( ४ ) वातरक्तास एरंडेलांत गुण नाहीं, ( ५ ) आमवायु, उदर, व गुल्म यांस सुंठीचे काढ्यांत गुण शेंकडा ९८. ( ६ ) नेत्ररोगास ह्मशीचें तुपांत, गुण शेंकडा ९८; ( ७ ) काळे केंस होण्यास माक्याचे रसांत. गुण बरोबर येत नाहीं. ( ८ ) ज्वरास आल्याचे रसांत गुण, शेंकडा ९०. ( ९ ) पांडुरोग, जीर्णज्वर, यांस पुनर्नव्याचा रस व मध यांत, गुण शेंकडा ८०. ( १० ) ओकारी, अरुचि, कास, श्वास, उचकी यांत त्रिफळा चूर्णांत व मधांत गुण शेंकडा ८२. ( ११ ) कावीळ, पित्त, प्रमेह यांस गुळवेलीचे काढ्यांत मध घालून देणें गुण शेंकडा ९०. ( १२ ) दाहा, मूत्रकृच्छ, रक्तप्रदर. श्वेतप्रदर, यांस गोखरू व दारूहळदीचे काढ्यांत गुण शेंकडा ८०. ( १३ ) क्षयावर खडीसाखर व तूप यांत, गुण शेंकडा ६४ ( १४ ) मूळव्याधीवर बाळहिरड्याचे काढ्यांत गुण शेंकडा ६०.

## ९७ प्रवाळभस्म.

पोंवळें किंवा पोंवळयांच्या कांड्या निंबुच्या रसांत ४ प्रहर भिजत घालाव्या. ह्मणजे शुद्ध होतात. नंतर त्यांचें वस्त्रगाळ चूर्ण करून त्यांत एक गुलाबाचें फूल टाकून घोटावें. एकजीव करून कोरडें होईपर्यंत करावें. या

प्रमाणें २१ फुलें घोटावीं ह्मणजे उत्तम भस्म होतें. ( प्रत्येक फूल घोटणें झाल्यावर उन्हांत ठवावें ) किंवा गुलाब-पाण्याचीं २१ सूर्यपुटें द्यावीं ह्मणजेही उत्तम भस्म होतें. याचें घेण्याचें प्रमाण १॥ गुंजेपासून तीन गुंजा-पर्यंत आहे. ( १ ) दीड मासा पिंपळीचें चूर्ण ६ मासे मध यांत घेतल्यानें जीर्णज्वर, उष्णकास, श्वास, उचकी, यांचा नाश होतो. शेंकडा गुण ९८. ( २ ) गाईचें दूध ५ तोळे व खडीसाखर ६ मासे यांत द्यावें ह्मणजे पित्ताचें शमन होतें. गुण शेंकडा ८०. ( ३ ) प्रदरास गाईचे धारोष्ण दुधांत गुण शेंकडा ७५ ( ४ ) तुळशीचा रस ४ मासे, मध ६ मासे यांत द्यावें ह्मणजे वायूचा नाश होतो. गुण शेंकडा ३४ ( ५ ) आवळ्याचे मुरांब्यांत घेतल्यानें भ्रम, पित्तप्रकोप, चक्कर, घेरी, यांचा नाश होतो. गुण शेंकडा ८५. ( ६ ) आवळकाठीचें चूर्ण ४ मासे, खडी-साखर ६ मासे, तूप एक तोळा यांत द्यावें ह्मणजे आम्ल-पित्तापासून छातींत व गळ्यांत जळती लागते ती दूर होते. गुण शेंकडा ९०. ( ७ ) दूध पावशेर, तूप १ तोळा, खडीसाखर ६ मासे यांत द्यावें ह्मणजे धातु घट्ट होते, धातु वाढते, तेज आणि बळ प्राप्त होतें, पौष्टिक-पणा येऊन कामोद्दीपन होतें. याचा गुण शेंकडा ८० ( ८ ) जाग्रणापासून झालेल्या विकारावर याचा चांगला उपयोग होतो. ( ९ ) तिडिकप्रमेहास तुप साखरेंत द्यावें शेंकडा ७८ गुण येतो. यानें दाह शमन होतो. शेंकडा ९० गुण.

## ९८ मंडूरभस्म.

लोखंडाच्या शांकडाचे कोळसे करून त्यांत १००

वर्षांपलीकडील असें जुनें लोहाचें कीट घालून भात्यानें फुंकावें. चांगलें लाल झाल्यावर गोमुत्रांत विझवावें. या प्रमाणें ७ वेळ विझविलें ह्मणजे शुद्ध होतें.

शुद्ध लोहकिटाचें बारीक चूर्ण करून गोमूत्रांत व त्रिफळ्याच्या काढ्यांत पृथक् पृथक् घोटून शरावसंपुटांत ठेवून मातकापड करावें, व गजपूट द्यावें ह्मणजे उत्तम गुणकारी मंडूर तयार होतो. हा दोन गुंजांपासून चार गुंजांपर्यंत द्यावा. ( सर्व रोगांवर चालतो ) पुनर्नव्याचे काढ्यांत किंवा चूर्णाबरोबर दिल्यास पांडुरोगाची सूज, इतर सूज, हलीमक, कामला आणि कुंभकामला यांचा नाश होतो. ताकात संग्रहणीवर द्यावा. याचा गुण पांडुरोग शेंकडा ७४; सूज शेंकडा ८०; हलीमक कामला शेंकडा ९२; कुंभ कामला शेंकडा ७०; संग्रहणी शेंकडा ६० आहे.

## ९९ सुवर्णमाक्षिक भस्म.

सुवर्णमाक्षिकाचें वस्त्रगाळ चूर्ण करून कढईत तापवून ( लाल झाल्यावर ) त्रिफळ्याचे काढ्यांत तीन वेळ ओतावें ह्मणजे शुद्ध होतें नंतर शेळीचें मूत्र, आंबट ताक किंवा निंबूरसांत खलून परळांत घालून मातकापड करून एक गजपूट द्यावें ह्मणजे उत्तम भस्म होतें. हें एक गुंजेपासून ४ गुंजां पर्यंत अनुपान योजून द्यावें. याचा उपयोग सर्व रोगांवर होतो. त्रिफळा, त्रिकटू, मिरीं व तूप हीं याचीं विशेष अनुपानें आहेत. ( १ ) परम्यास वंशलोचन व पिठी साखर यात किंवा चंदनी तेलाचे थेंब पिठी साखरेंत मिळवून त्यांत द्यावें गुण शेंकडा ८०. ( २ ) मूळव्या-

धीस लोणी, खडीसाखर व नागकेशराचें चूर्ण यांत गुण शेंकडा ९९. ( ३ ) क्षयास मध व अडुळशाच्या पिकलेल्या पानाच्या रसांत, गुण शेंकडा ७४. ( ४ ) कुष्टास पांढऱ्या पांगाऱ्याचें चूर्ण, पिठी साखर व लोणी समभाग एकत्र करून त्यांत; गुण शेंकडा ४०. ( ५ ) कफास मध पिंपळींत, गुण शेंकडा ८०. ( ६ ) पित्तास आवळकाठी चूर्ण, तूप, साखर समभाग यांत किंवा आवळयाच्या मुरांब्यात; गुण शेंकडा ९९ ( ७ ) मस्तकरोगांस गाईचें तूप व खडीसाखर यांत; गुण शेंकडा ८८. ( ८ ) कंठरोगास तूप व खडीसाखर यांत; गुण नाहीं. ( ९ ) पांडुरोगास पुनर्नव्याच्या काढ्यांत; गुण शेंकडा ७७. ( १० ) विषास तांदुळाचे धुवणांत; गुण नाहीं. ( ११ ) उदररोगांस त्रिफळयांत द्यावें. गुण साधारण. ( १२ ) सुजेस निर्गुडीचे किंवा पुनर्नव्याचे रसांत द्यावें गुण शेंकडा ९०. ( १३ ) त्रिदोषास आल्याचा रस, तुळशीचा रस, व मध यांत द्यावें गुण शेंकडा ६०. ( १४ ) धातुपुष्टीस हें भस्म २ गुंजा व खडीसाखरेची पूड ६ मासे, पावशेर गाईचे दुधात घालून तें दूध १४ किंवा २१ दिवस सेवन करावें ह्मणजे धातुस्थानची कडकी जावून उष्णता शांत होते व धातुपुष्ट होते. वीर्य पतन होत असल्यास तें बंद होऊन चांगलें कामोद्दीपन होतें गुण शेंकडा ९९.

## १०० सुवर्णमालिनीवसंत.

सोन्याचा चूर किंवा वर्ख १ तोळा, मोत्याचा चूर २ तोळे, हिंगूळ ३ तोळे, पांढरीं मिरीं ४ तोळे, आणि कळखापरी ८ तोळे या सर्वांचा एक जागीं खल करून

त्यांत गाईचें लोणी २॥ तोळे घालून एक दिवस चांगला खल करावा. नंतर निंबूचा रस घालून ४२ दिवस खल केला असतां हा वसंत उत्तप होतो. हा एक किंवा दोन गुंजा मध पिंपळींत दिला असतां पुष्टि येते, आणि जीर्ण-ज्वर, क्षयरोग, कास, श्वास, शैत्य, गुदामय वायु, व गुल्मरोग हे दूर होऊन धातुगतज्वर, रक्तविकार, कृशत्व, वातरोग, वृद्ध मनुष्याचे रोग, गर्भीणीचे रोग, बाळंतरोग हेही त्वरित नाश पावतात. पथ्य दूध भात. याचा गुण सर्व रोगांवर शेंकडा ९९.

---

## पूरणिका.

१ पारदशुद्धि-निंबूचे रसांत खड्याचा हिंगुळ एक प्रहर खलून डमरूयंत्रांत घालून खालीं जाळ करून त्यांतील पारा वर जाऊन बसतो. तोच शुद्ध पारा होय. हाच सर्व कार्यांचे ठायीं योजावा.

२ गंधकशुद्धि-आंवळसरा गंधक घेऊन तो कढईत चौपट तूप घेऊन त्यांत पातळ करावा. नंतर तो गाईचे दुधावर फडकें ठेवून त्यांत ओतावा दुधांत पडेल तो शुद्ध गंधक जाणावा. तो वाळवून ठेवावा.

३ अभ्रकशुद्धि भस्म-काळा वज्राभ्रक कोळशाचे अग्निवर भात्यानें किंवा फुंकणीनें तापवून गाईचें दूध, त्रिफळ्याचा काढा, कांजी व गोमूत्र यांत पृथक सात सात वेळ तापवून बुडवावें. ह्मणजे अभ्रक शुद्ध होतो. त्याचें काढून बारीक चूर्ण करावें. या चूर्णासमान कळमी सोरा

घेऊन दोहोंचा गोमूत्रांत खल करावा. नंतर गोळा करून शरावसंपुटांत ठेवून मातकापड करून गजपूट अग्नि द्यावा ह्मणजे पांढरें शुभ्र अभ्रकभस्म होतें. हें सर्व कामांत योजावें.

४ हिंगुळाची शुद्धि–हिंगुळ खलांत घालून मेंढीच्या दुधाचीं सात व निंबुरसाचीं सात पुटें द्यावीं. अशीं १४ पुटें दिलीं असतां शुद्ध होतो.

५ शिलाजितशुद्धि–शिलाजित गाईचे दुधांत, त्रिफळाचे काढ्यांत व माक्याचे रसांत वेगळा वेगळा एक एक दिवस खलून कोरडा करावा ह्मणजे शुद्ध होतो.

६ हिराकसशुद्धि–माक्याचे रसांत खलून वाळवावा ह्मणजे शुद्ध होतो.

७ हिंगाची शुद्धी–हिंगास रू ( कापूस ) लपेटून पेटवावा. कापूस जळल्यावर काढावा ह्मणजे शुद्ध होतो.

८ टांकणखाराची शुद्धि–कोळशाचे विस्तवावर लाही करावी ह्मणजे शुद्ध होतो.

९ भांगेची शुद्धी–तव्यावर घालून नुसती भाजावी व फडक्यांत घालून भिजवून तिचें स्वच्छ पाणी काढावें. नंतर सुकवून ठेवावी ह्मणजे शुद्ध होते.

१० अफूची शुद्धि–अफू खलांत घालून आल्याच्या रसाचीं ७ पुटें द्यावी ह्मणजे शुद्ध होते.

११ कुचल्याची शुद्धि–किंचित् तूप लावून निर्धूम अग्नीवर भाजाव्या ह्मणजे बिया शुद्ध होतात.

१२ गुग्गुळ शुद्धि–त्रिफळ्याचे काढ्यांत दोलायंत्रानें एक प्रहर शिजवावा. नंतर जाड वस्त्रानें गाळावा ह्मणजे शुद्ध होतो.

१३ कलखापरी शुद्धि-गोमूत्रांत ७ दिवस भिजत ठेवावी ह्मणजे शुद्ध होते.

१४ मोरचूतशुद्धि-मोरचूत निंबूरसांत खलावा. त्याच्या समभाग टांकणखार व मध घेऊन त्याचा एकत्र खल करावा, व शरावसंपुटांत घालून गजपूट द्यावें ह्मणजे उत्तम शुद्ध होतो.

---

## यंत्रें व अग्निपुटें.

१ डमरूयंत्र-खालचें मडकें लहान व वरचें दुप्पट मोठें अशीं दोन मडकीं आणून त्यांस आंतून व बाहेरून गोपीचंदनाचा पाण्यांत कालवून चांगला लेप करावा. व वाळूं द्यावा. नंतर लहान मडक्यांत हिंगूळ घालून त्यावर मोठें मडकें पालथें घालावें. आणि त्याचे तोंडाचे संधीस चुना १ भाग, कणीक २ भाग, एकत्र कालवून त्याचा संधिलेप मडकें हालेनासा करावा. मग तें चुलीवर ठेवून खालीं ४ प्रहर अग्नि करावा. वरचे मडक्याचे बुडावर ओल्या फडक्याची घडी वारंवार बदलून ठेवित जावी. ह्मणजे ४ प्रहरांनीं हिंगुळांतील पारा निघून वरचे मोठे मडक्याचे तळास जावून लागतो. नंतर तें यंत्र खालीं उतरून वांकडें करून ठेवावें. निवाल्यावर वरच्या मडक्याचे बाजूस पारा जमून राहतो तो युक्तीनें काढावा.

२ दोलायंत्र-ज्या द्रव्यांत औषध शुद्ध करणें असेल तें द्रव्य मडक्यांत घालावें. आणि जें औषध शुद्ध करावयाचें आहे त्याची पुरचुंडी करून मडक्याचे तोंडावर काडी ठेऊन तिला मडक्यांतील द्रव्यांत किंचित बसे

अशी ती पुरचुंडी लोंबती बांधावी व मडक्याचे तोंडावर परळ पालथा ठेवून संधिलेप करून तें मडकें चुलीवर ठेवावें. व खालीं साधारण अग्नि करावा. ह्मणजे पुरचुंडींतील औषध दोन घटकेनीं वाफेनें शुद्ध होतें

१ गजपूट–सवा हात चैारस खळगा खणून त्यांत अर्धा खळगा गोंवऱ्यांनीं भरून त्यावर मातकापड केलेलें भांडें ठेवावें. नंतर तो खळगा गोवऱ्यांनीं पूर्ण भरून अग्नि द्यावा. अग्नि आपोआप विझल्यावर औषध काढावें. त्यास गजपूट ह्मणतात. किंवा हजार गोवऱ्या घालून अग्नि देतात त्यासही गजपूट ह्मणतात.

---

## परिभाषा.

१ अंगरस–उत्तम ओली वनस्पति आणून त्याचवेळीं कुटून वस्त्रांत गाळून जो रस काढतात तो.

२ पुटपाक–ओली वनस्पति कुटून गोळा बांधून तो गोळा वडाचे किंवा एरंडाचे पानानी गुंडाळून त्यावर अंगुळप्रमाण मातीचा लेप करून त्यावर खालवर गोवऱ्या घालून गोळ्याची माती तांबडी लाल होईपर्यंत भाजावी. नंतर गोळा बाहेर काढून माती व पानें फेंकून द्यावीं. त्याचा आंतील शिजलेल्या द्रव्याचा रस काढावा. तो.

३ काढा–काढ्यांतील सर्व औषधें मिळून चार तोळे असावीं. तीं एकत्र करून थोडीं कुटावीं व १६ पट पाणी घालून मंद अग्नीनें तें पाणी मातीच्या चिकण्या मडक्यांत आटवावें अष्टमांश उरला ह्मणजे काढा तयार झाला. शिजवितेवेळीं वर झांकण मात्र ठेवूं नये. नाहीं तर काढ्याचें पाणी दूषीत होऊन विकार करील.

**४ अवलेह**—औषधांचे काढे, रस आदीकरून फिरून आटवून पाकासारिखे घन ( दाट ) करितात त्यास अवलेह ह्मणतात.

**५ चूर्ण**—सुकलेलें औषध बारीक कुटून वस्त्रगाळ करून ठेवावें त्यास चूर्ण ह्मणतात.

**६ गुटिका**—चूर्णाप्रमाणें बारीक औषधी करून त्यांत साखरेचा किंवा गुळाचा पाक घालून एकत्र घोटून त्याच्या गोळ्या करितात याचप्रमाणें मधांतही करितात त्यास गुटिका, वटिका ह्मणतात.

**७ स्नेहपाक**-( तेल व तूप सिद्ध करण्याचा प्रकार ) औषधें बारीक चटणीसारखी वांटून त्यांचे चौपट तेल अथवा तूप घ्यावें. त्या तेलाचे चौपट पाणी आदीकरून पातळ पदार्थ घ्यावे. सर्वांना एकत्र करून मंदाग्निनें तेल शिल्लक राहीपर्यंत करावें. पाणी जळलें ह्मणजे पाक सिद्ध झाला. तें औषध गाळून ठेवावें.

**८ पाक**—साखरेचा किंवा गुळाचा पाक करून त्यांत सांगितलेलीं औषधें बारीक करून घालतात व मंद आंचेनें शिजवितात. नंतर परातीस तूप लावून त्यावर शिजलेलें औषध लावून थापून त्याच्या वड्या कापतात किंवा लाडू बांधतात त्यास पाक ह्मणतात.

---



# कठिण शब्दांचा अर्थ.

### अ

आतिसार–हगवण.
अग्निदीपक–अग्निप्रदिप्त करणारें.
अपचि–गंडमाळेचा भेद.
अपस्मार–फेंपरें, मिरगी, झुरें
अर्दितवायु–तोंड व हनुवटी यांस वाकडें करणारा वायु.
अर्बुद–आवाळू.
अर्श–मुळव्याध.
अवलेह–औषधादिकांचे काढे इ० पुनः आटवून काकवी सारखे घट्ट करितात ते
अश्मरी–मुतखडा.
आध्मान–पोट फुगणें.
आनाह–मलबद्धरोग.
अपामार्ग–आघाडा.
आम–आवरक्त.
आमवात–( आमवायु )
अंगरस–ओली वनस्पती कुटून जो रस निघतो तो.

### इ

इंद्रजव–कुड्याचें बीं.
इंद्रावण–कडू इंद्रावणाचे वेल असून त्यास बेलफळा-एवढीं पिवळीं फळें येतात. ( कंडल )

### उ

उन्माद–उन्मत्तवायु.
उपदंश–गर्मीचा आजार.
उदावर्त–उदावर्त वायु.

### क

कडुनिंब–बाळंतनिंब.
कज्जली–गंधक व पारा एकत्र खलून काजळासारखी करितात ती.
कबाबचिनी–नागकेशर
कर्णनाद–कानांत आवाज होणारा रोग.
कल्क–ठेंचलेलें ओलें औषध.
कवचबी–कुहिरीचें बीं.
काकडशिंगी–जंगली हिरड्याचें फूल.
कामला–कांवीळ, कामीन, हळ्यारोग.

कामोद्दीपक-जीं औषधें शुक्रधातूला वाढवून स्त्री भोगाविषयीं हर्षयुक्त शक्ति देतात तीं.
काळेंजिरें-कडूजिरें.
कास-खोकला.
कंकोळ-कापुरचिनी, शितळचिनी.
कांजी-तांदुळादिकांची पेज काढून मडक्यांत घालून तोंड बांधून २।३ दिवस राहूं द्यावी. ह्मणजे आपोआप जी पेज आंबते ती.
कुळिथ-हुलगे.
कुष्ट-कोड.
कृमि-जंतु, किडे. [मूळ.
कोष्ट-चोख, कांटेघोत्र्याचें
कोळिंजन-जुन्या नागवेलीचें मूळ.

ग

गुल्म-वायगोळा.

च

चोख-पितोळा, कांटेघोत्रामूळ.

छ

छर्दी-ओकारी.

ड

डोरली-रानवांगी.

त

तज-बारकी दालचिनी.
तालिमखाना-कोळिस्ता.
त्रिकटु-सुंठ, मिरें, पिंपळी.
त्रिजात-दालचिनी, तमालपत्र, एळची.
त्रिदोष-वात, पित्त, कफ, यांचा समुदाय.
त्रिफळा-हिरडा, बेहडा, आवळकाठी यांच्या टरफलांचें समभाग चूर्ण.
त्रिक्षार-जवखार, सज्जिखार, टांकणखार.

द

दांती-दांतीचें झाड.
दशमुळें-सालवण (रान गांजा) पिठवण, रिंगणी, डोरली (रानवांगी) गोखरू, ऐरण (टाकळा) टेंटू, पहाडमूळ (वासनवेल) बेल, शिवण.

ध

धमासा-दुलभा. [णारें.
धातुवर्धक-धातूला वाढवि-

### न

नागवेल–विड्याच्या पानाचा
निशोत्तर–तेड. [ वेल.

### प

पटोल–कडु पडवळ.
पाचक–पचन करणारें.
पाडळ–पाहाडमूळ.
पाठा–पाहाडमूळ.
पार्श्वशूल–पाठीचा शूल.
प्लीहा–पान्थरी. कौलु
पुटपाक–ओलें औषध पा-
नांत गुंडाळून वर मातीचा
लेप करून भाजून काढतात.
पुनर्नवा–वसू.
प्रकोप–क्षोभ. [ धुपणी.
प्रदर–पांढरी किंवा तांबडी
प्रमेह–परमा.
प्रवाहिका–पातळ हगवण.
पंचलवणें–मीठ, बांगडखार,
सैंधव, बिडलोण, संचळ,
पंचांग–फळ, मूळ, पान,
फूल, साल.

### ब

बलवृद्धि–बल वाढविणारें.
बलकारक–बल उत्पन्न कर
बाधीर्य–बहिरेपणा. [ णारें.
बिबला–असाणा.

### भ

भावना–पुट देणें.

### म

मूत्रकृच्छ–उन्हाळी.
मूत्रशुक्र–मुत्रांतून धातु जाणें
मूत्राश्मरी–मूतखडा.
मोचरस–सावरीचा डींक.
मंड–दह्याची निवळी.

### य

यकृत–पोटांत उजवीकडे
जो रोग होतो तो. (कौलु)

### र

रक्तार्श–रक्ताची मुळव्याध.
रास्ना–मुंगुस वेल. [ चीक.
रुमामस्तकी–सुरूचे झाडाचा

### व

वटक–गोळ्या, लाडू.
वमन–वांति, ओकारी.
वाजीकरण–वीर्यवृद्धि करून
कामोत्तेजन करणारें औषध.
वातरक्त–रक्तपित्ती, सुन-
बहिरी. [ खरूज.
विचार्चिका–बारीक फोडांची
विद्रधि–गांठ.
विजया–भांग. हरीतकी.

विषमज्वर—कमीजास्त होणारा ज्वर. (अनियामतज्वर)

विषूचिका—पटकी, महामारी.

विसर्प—इसप, धावरें.

विस्फोटक—आंगावर फोड येतात तो रोग.

वृद्धि—वाढणें.

वृष्य—वीर्यवृद्धीकर वाजीकरण, कामोत्तेजक.

श

शतावरि—सहस्त्रमुळी.

शराव—मातीचा परळ.

शरावसंपुट—एका परळावर दुसरा परळ ठेवून संपूट करितात तें.

शुक्र-रेत, वीर्य.

शोथ-सूज.

श्वित्र—पांढरें कोड.

स.

सन्निपात—तीन दोषांचा कोप किंवा क्षय.

समुद्रलोण—मीठ.

स्तंभक—धातु घट्ट करणारें.

स्वरस—अंगरस.

ह

हलीमक—पांडुरोगाचा एक भेद.

हिक्का—उचकी

क्ष

क्षुद्बोध—भूक लागणें.



# जाहिरात.

सर्वत्र लोकांस कळविण्यांत येतें कीं, आमचे-जवळ सर्व प्रकारच्या रोगांवरील औषधी, काढे, गुटिका, चूर्ण, पाक, अवलेह इत्यादि आहेत. रोगाचें लक्षण कळविलें असतां हटकून गुण, देणाऱ्या औषधांची योजना करूं! मग ते रोग कोणत्याही प्रकारचे असोत, त्यांचें आम्हीं निर्मूलन करूं!! औषधीचा खर्च आगाऊ किंवा व्ही. पी. नें औषध पाठविण्यांत येईल.

## १ मकरध्वज गुटिका.

ह्या गोळ्या ७ किंवा १४ दिवस घेतल्या असतां धातु जाणें बंद होतें, प्रमेह नाहींसे होतात, पुरुषत्व वाढतें, शक्ती प्राप्त होते. पौष्टिकता येते आणि कामोद्दीपन होऊन धातू घट्ट होते. किंमत ३० गोळ्यांस १ रुपया. १०० गोळ्यास ३ रु. शिवाय पोष्टेज.

## २ रतिकामोदय गुटि

ज्या स्त्रियांना कांहीं खोडी असून त्या योगानें संतती होत नसेल, ज्यांचीं मुलें उपजतांच मरतात, ज्या काकवंध्या आहेत, ज्यांना संततीची आवड आहे, अशा स्त्रियांनीं ह्या गुटिकांचें सेवन करावें म्हणजे ४।५ वे पाळीस हटकून गर्भधारणा होईल. गोळ्या वनस्पतीच्या आहेत डबीस किंमत ४ रुपये. शिवाय पोष्टेज. अनुपान खर्डा सोबत.

## ३ अतिसारेंदु गुटिका.

ह्या गोळ्यांच्या योगानें सर्व प्रकारची हगवण ल्यास

जाते. गुण त्वरित येतो. पुरुष स्त्रिया व मुलें या सर्वांस उपयोगी. ३० गोळ्यांस १ रुपया. १०० गोळ्यांस ३ रुपये. शिवाय पोष्टेज.

### ४ कालावर्तनचक्र.

ह्या गुटिकांच्या सेवनानें महामारीचा रोग होत नाहीं. गांवांत महामारीचा आजार चालू असतां ह्या गोळ्यांचें सेवन केलें असतां आजार बाधण्याची बिलकूल भीती नाहीं. १ रुपयास ४० गोळ्या. १०० गोळ्यांस २ रुपये. शिवाय पोष्टेज.

### ५ कालखड्ग.

कितीही जोराचा महामारीचा आजार बाधला तर या गोळ्यांच्या योगानें हटकून गुण येतो व रोगनिर्मुक्त होतो. याचा एकवेळ अनुभव घेऊन पहावा. ३० गोळ्यांस १ रु. १०० गोळ्यांस ३ रु. शिवाय पोष्टेज.

### ६ प्रमदानंद गुटी.

ह्या गोळ्या बाळंतरोगावर अप्रतिम गुण देणाऱ्या आहेत. शूळ, श्वास, कास, ज्वर, मूर्च्छा, कंप, मस्तकपिडा, बडबड, तृषा, दहा, तंद्रा, अतिसार, ओकारी इतक्या उपद्रवांनीं युक्त व त्रिदोषात्मक अशा बाळंतरोगांचा हटकून नाश होतो. ३० गोळ्यांस २ रु. १०० गोळ्यांस ६ रु. अनुपानपत्र सोबत. शिवाय पोष्टेज.

### ७ अपस्मारविध्वंस गुटी.

ह्या गोळ्यांच्या योगानें फेंपरें, किंवा घुरें, मिरगीचा किडा, उन्माद, स्मृतिनाश, भूत, पिशाच्च इ० कांची बाधा, बालग्रह इ० विकार लवकर नाश पावतात. ४० गोळ्यांस ३ रु.

## प्रदरविध्वंस गुटी.

ह्या गो[illegible] या योगानें स्त्रियांची तांबडी, पांढरी धुपणी नाश[illegible]. धुपणीचा सोमरोग ह्मणून भेद आहे तोही या गु[illegible]च्या सेवनानें दूर होतो. ह्या गोळ्या वरील रोगाव[illegible] अचुक गुणकारी आहेत. ३० गोळ्यांस २ रु, शिवाय ट. ह.

## ९ प्रमेहदर्पास्त्र गुटी.

ह्या गोळ्या मधुमेह खेरीज करून बाकी सर्व प्रकारच्या परम्यावर उपयोगीं पडतात. कोणत्याहा प्रकारचा परमा असो तो त्वरित नाश पावतो. तिडिक १ प्रहरांत बंद होते. २० गोळ्यांस १ रु. १०० गोळ्यांस ४ रु. शिवाय ट. ह.

## १० अगदतंत्र.

ह्या गोळ्या बालकांच्या सर्व रोगांवर उपयोगीं पडतात. यांचें नेहमीं सेवन केलें असतां बालकांस कोणताच रोग होणार नाहीं. आंकडी, डबा, कृमि, श्वास इ० विकार त्वरित दूर होतात व मुलें पुष्ट होतात. अन्न व दुध चांगलें पचतें. ५० गोळ्यांस १ रु. शिवाय ट. ह.

य शिवाय सर्व प्रकारच्या रोगांवरील औषधी तयार आहेत. मागविल्यास पाठवूं.

नाटपेड पत्र घेतलें जाणार नाहीं उत्तरास टिकीट असावें. पत्ता इंग्रजी किंवा बालबोध स्पष्ट लिहावा.

**रमाकांत बापूराव रत्नपारखी वैद्य.**
**आर्य संजीवन औषधालय.**
**मु० व पोष्ट-वरूड. जि० उमरावती. ( वऱ्हाड. )**

# वनौषधी दुकान.

आमचे गांवाजवळून, सातपुडा, अमरकंटक, विंध्याद्रि इत्यादि पर्वतांच्या ओळी अगदीं नजीक आहेत. आह्मीं सदर पर्वतांतून उत्तम प्रकारच्या रसभरित वनस्पति, जमवून दुकान मांडून त्या वनस्पति विकीस ठेविल्या आहेत. ज्या कोणास कोणत्याही प्रकारची वनस्पति (मुळ्या, साल, पानें, फळें, फुलें,) इत्यादि पाहिजे असल्यास योग्य किंमतीस पाठवूं. औषधी खऱ्या आणि ताज्या पाठविण्यांत येतील! दशमुळांच्या औषधी आणि काढ्यांची यादी आली असतां त्याप्रमाणें काढ्यांच्या जिनसाही पाठवूं. एकवेळ मागणी करून अनुभव पहा.

डुकरकंद, भुईकोहळे, सावरकंद, पाहाडमूळ, वावडिंग, मुरडशेंग, बाहवा, मुसळ्या, इंद्रजव, भिलावे, चित्रक, सुरण, रोशेल गवत, करंज, टेंटू, ऐरण, मालकांगोणी इ० वनस्पति आमचे पर्वतावर फार आहेत. ज्यांना जरूर असेल त्यांनी मागून अनुभव पहावा.

पत्ता—

**श्रीरंग बापूराव रत्नपारखी.**

**वनौषधी दुकान.**

**पोष्ट-वरूड.** जि० उमरावती. (वऱ्हाड.)